


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






साहित्य ☆ कला ☆ संस्कृती




जून १९७० ✱ वर्ष २६ वे ✱ मूल्य १॥ रुपया

## श्रेय नामावली



★ मासिक बिंगचित्रमाला ★

**दलाल आर्ट स्टूडिओ : ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४**

टे. नं. ३५७७६५
Gram : DALALART

संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक : श्री. दीनानाथ दलाल, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, केनेडी ब्रिज मुंबई ४, यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खेतवाडी मेन रोड, मुंबई नं. ४ येथे छापले. या प्रतीची किंमत १॥ रु.+रजि. पोस्ट ८० पैसे. वार्षिक वर्गणी : दिवाळी अंकासह रु. १५. अंकात प्रसिद्ध झालेली मते ही चालकांचीही अधिकृत मते असतातच असे नाही. चित्रे व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन. Registered with the Registrar of Newspapers for India under RN No. 1612/57 DIPAVALI : Dalal Art Studio, 42, Kennedy Bridge, Bombay-4.










अनुक्रमणिका





**दलाल आर्ट स्टुडिओ**

४२, केनेडी ब्रीज, मुंबई–४

टेलिफोन : ★ तारेचा पत्ता :

३५७७६५ DALALART


● **वर्गणीदारांस सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १५ द्वैवार्षिक वर्गणी रु. २५; त्रैवार्षिक वर्गणी रु. ३० परदेशी वार्षिक वर्गणी रु. २०

● **वर्गणी** मनिऑर्डरने द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नावे, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास १.५० पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याही महिन्यापासून वर्गणीदार होता येते.

● **अंक न पोचल्यास** कळवावयाचे झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावे. अंक ऑफिसमध्ये शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातीचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यात येते. तरीही तांत्रिक अडचणीमुळे अगर अन्य कारणामुळे जाहिरातीत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरात सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेले नापसंत साहित्य परत पाठविले जाते. पुरेसे पोस्टेज नसल्यास ते निकालात काढले जाईल. ● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झाले तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

---


**संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक :** श्री. दीनानाथ दलालयांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खेतवाडी मेन रोड, मुंबई नं. ४ येथे छापून, दलाल आर्ट स्टुडिओ ४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४ येथे प्रसिद्ध केले.


# लोकशाहीचा पाया—विचारमंथन

संगीत अंकाची साथ जमली. सूर जुळले. लय साधली अशी दाद संगीतक्षेत्रातल्या जाणकारांनी व रसिक वाचकांनी दिल्याने आमचा उत्साह द्विगुणित झाला आहे. संगीत अंकातील मुलाखती, कथा जाणकारांना पसंत पडल्या. श्रमपरिहार झाला.

पण प्रस्तुत अंक हा श्रम-परिहार अंक म्हणून काढलेला नाही. त्यातही श्रम, साक्षेप जाणवेल. यज्ञ ही खजुराहोच्या पार्श्वभूमीवरील शृंगारिक कादंबरिका, 'अ-जून' कर्मयोगी मणेरकर यांचे बहारदार व्यक्तिचित्र, निवडक व सुरेख कथांच्या बरोबरच फडणीसांच्या हसऱ्या गॅलरीची ओळख, मासिक बिंगचित्रमाला व मासिक सदरे हा खचून मजकूर आम्ही देत आहोत. 'विशेषांक' म्हणून लेबल न लावताही प्रस्तुतचा अंक 'विशेष-अंक' ठरेल असा आम्हास विश्वास वाटतो.

एप्रिल अंकात आम्ही विख्यात गणिती व तत्त्वज्ञ बर्ट्रांड रसेल यांजवरील प्रा. ग. ना. लवंदे यांचा विस्तृत लेख प्रसिद्ध केला होता. त्या लेखाचे भल्या-बड्यांकडून स्वागत झाले तर काहींची झोप उडाली. ही स्वागताची व संतापाची काही पत्रे आम्ही दीपावलीत प्रसिद्धही केली व काही या अंकात प्रसिद्ध करीत आहोत. अजूनही भिन्न भिन्न मतप्रदर्शन करणारी पत्रे येत आहेत. ह्या साऱ्या पत्रांचा परामर्ष घेण्याचे प्रा. लवंदे यांनी मान्य केले आहे. तेव्हां वाचकांनी ३० जून १९७० पर्यंत आपल्या लेखी प्रतिक्रिया 'दीपावली'कडे अवश्यमेव पाठवाव्या. प्रा. लवंदे यांच्या मार्मिक व मर्मभेदी लेखणीतून उतरलेले काही स्फोटक-प्रक्षोभक पण विचारार्ह वाटतील असे लेख 'दीपावली'तून प्रसिद्ध करावेत असा विचार आहे. पुष्कळशा जुन्या निष्ठा व मूल्ये नव्या परिस्थितीत पारखून घेऊन डोळसपणे पुढील प्रवास होण्यासाठी विचार-मंथन आवश्यक असते अशी दीपावलीची श्रद्धा आहे. विचारमंथन तर लोकशाहीचा पाया आहे असे आम्ही मानतो.

ह्या 'विशेषांक' नसलेल्या 'विशेष अंका'नंतर मात्र "कथा-विशेषांक'ची भेट घेऊन दीपावली रसिकांच्या भेटीस येईल. 'कथा अंक' म्हणजे जमविलेल्या कथा एकत्र छापणे नव्हे ! तशा कथा तर सर्वच अंकात असतात. मग 'कथा-विशेषांक' कशाला ? उत्तरासाठी 'दीपावली'चा जुलै १९७० चा अंकच पहा ! कथा अंकात शृंगार, वीर रसात्मक, रहस्य, ग्रामीण, व्यक्ति-रेखात्मक, विनोदी, सांगितिक आणि एकपानी–अशा विविध वातावरणावरील कथा राहणार आहेत. जुलै हा बरसातीचा महिना ! पहिला पाऊस खात, चिंबभिजत, आकाशाच्या छत्रीखाली भटकण्यात जी मजा आहे तीच मजा ह्या विविध रसात्मक कथारूप भावाविष्कारात न्हाऊन निघण्यात आहे.

**– संपादक**

## हौदभर दिल्यावर 'बूंद'ची काय मातबरी ?

स. न. वि. वि.

'दीपावली'च्या मे अंकातील श्री. आ. रा. फुले यांचे पत्र वाचले. त्यावरील आपली प्रतिक्रियाही वाचली. मात्र आपणा उभयतांशी मी सहमत होऊ शकत नाही. श्री. गोविंदराव तळवलकरांचा श्री. भावे यांजवरील लेख वाचण्यासाठी मीही उत्सुक होतो; पण तो आपण देऊ शकला नाही त्याबद्दल हळहळ वाटली नाही. चालू महिन्याच्या 'ललित'मध्येही ठणठणपाळानी याबाबत लिहिले. आपण आणि ठणठणपाळ एक गोष्ट विसरला काय ? दीपावलीच्या जुलै ६१ च्या अंकात सौ. वसुंधरा पटवर्धन यांनी भाव्यांवर जो लेख लिहिला आहे त्याचे आपणास विस्मरण पडले का ? त्या लेखाची सर कदाचित पुनः खुद्द वसुंधराबाईंनी लिहिले तरी त्यांना साधणार नाही एवढा तो सुन्दर होता. माडगूळकरांना दिसलेल्या, कळलेल्या भाव्यांहूनही ते भावे अधिक जवळचे वाटले. कदाचित् म्हणूनच तर भाव्यांनी मित्रांना वदी घातली नसेल ? वसुंधराबाईंनी लिहिलेला लेख Last word होता. अमृताच्या वाटीत खीर किंवा पायस किंवा बासुंदी ओतली तरी अमृताची गोडी आगळीच हे कुणीही मान्य करील. आणि एवढा सुन्दर लेख आपण एके काळी छापला असूनही स्वतःला 'भावडे' म्हणवून घेण्याची घाई उगीच केली. तो लेख म्हणजे हौद होता ! आणि एकदा हौदभर दिल्यानंतर 'बूंद से गयी' तर त्यात काय मोठंसं !

कळावे. आपला

कलकत्ता **श्री. बा. जोशी**

## 'दीपावली'तील 'गांधर्व गीता'

(पं. सीतारामभाऊ फातरपेकर यांना आलेल्या पत्रातील उतारा)

सु. न. वि. वि.

'दीपावली'मधली आपली मुलाखत वाचली. हा मुलाखत-लेख मला अतिशयच आवडला. ज्यांनी ज्यांनी आपल्या अभिजात शास्त्रीय संगीताचे खरेखुरे मर्म जाणले आहे, अशा मर्मज्ञ रसिक वाचकांना आपली ही मुलाखत म्हणजे 'गांधर्व गीता'च वाटावी. अशा असंख्य वाचकांतर्फे मी आपल्याला 'मानाचा मुजरा' करतो त्याचा मनःपूर्वक स्वीकार व्हावा ही विनंती.

आपण या मुलाखतीच्या रूपाने पूजनीय वुजुर्गांची मते, त्यांची श्रेष्ठ संगीतसाधना अशा महत्त्वाच्या विषयांची ओळख व जाणकारी करून दिली आहे, ती संगीतांच्या प्रामाणिक अभ्यासूंना उद्बोधक आणि मार्गदर्शी ठरणारी आहे आणि रंजकही आहे.

श्री. रामकृष्ण वाकरे यांनी सर्व मुलाखत अतिशय कौशल्याने घेतलेली असून तितक्याच मार्मिकपणे व रसवत्तेने सादर केलेली आहे. त्यांच्या या मुलाखतीतून जुन्या उस्तादांचे मार्मिक उद्गार जसे समजून येतात तसेच आपली संगीताची वाटचाल कशा तऱ्हेने होत गेली, आपली श्रेष्ठ तपश्चर्या, आपली गुरुनिष्ठा, सेवा, परिश्रम, आचार-विचार, अडचणी यांवर उत्तम प्रकाश पडतो. त्याचप्रमाणे आपली सांस्कृतिक आणि पारमार्थिक जडणघडण व आपले जीवनविषयक आणि कलाविषयक विचार, अपेक्षा, तळमळ, हेतू या सर्वांवरच यथायोग्य प्रकाश पडलेला आहे. आपण आपल्या जीवनामध्ये ज्या खस्ता खाल्ल्या, त्यांचे थोडक्यात परंतु मनोज्ञ व समर्पक दर्शन या मुलाखतीमुळे होते. आपण मुलाखतीमध्ये स्वतःचे आणि गुरुजनांचे श्रेष्ठ विचार सुस्पष्टपणे मांडलेले आहेत. त्यांचा व्यासंग करणाऱ्यांना खचित उपयोग होईल. अस्ताई, अंतरा, बंदीष, रागस्वरूप, लय, ताल यांचे संगीतातील कार्य व स्थान, संगीतातील सौंदर्यानुभूती, सरगम-प्रकरण इत्यादि मूलभूत विषयांवरील आपले विचार अगदी चिंतनीय असून तितकेच ते निःसंदिग्धपणे आलेले आहेत. या उत्कृष्ट मुलाखतीबाबत आपले व श्री. वाकरे यांचे कितीही आभार मानले तरी ते अपुरेच ठरतील.

कळावे. आपला

टिळक रोड, (डॉ.) **ना. र. मारुलकर**
पुणे–३०




[ पृ.न २१ वर ह ]

## विचारवंतांना आवाहन

**'दीपावली'च्या एप्रिलच्या अंकात बर्ट्रॅण्ड रसेलवर डॉ. प्रा. ग. ना. लवंदे यांचा लेख प्रसिद्ध झाल्यावर त्यासंबंधी खळबळजनक प्रतिक्रिया व्यक्त करणारी अनेक पत्रे 'दीपावली'-कडे आली. त्यांपैकी काही मे अंकात प्रसिद्ध केली असून आणखी काही पुढे या अंकात प्रसिद्ध केली आहेत. या पत्रांमधील आक्षेपांना डॉ. लवंदे स्वतः उत्तर देणार असून या विषयासंबंधी आणखी कोणाला काही मतप्रदर्शन करावयाचे असल्यास दि. ३० जून १९७० अगर त्यापूर्वी आमच्याकडे लिखाण पाठवावे. म्हणजे त्यांचाही समावेश डॉ. लवंदे यांच्या उत्तरात करता येईल.**

**– संपादक**

अनुक्रमणिका

## प्रौढत्वी निज शैशव जपणारे—



.....आयुष्याचा क्षण नि क्षण गीतेचा कर्मयोग आचरणारे मणेरकर म्हणजे वयाच्या अठ्ठ्याहत्तरीतही तरुणाचा उत्साह लाभलेली, विविध छंद जोपासणारी, संगीत व नाट्यवेडी व्यक्ती होय...त्या वेगळ्या व्यक्तीचेच हे आगळे व्यक्तिचित्र...

—प्रभाकर अत्रे

# कर्मयोगी सीताराम गणपति मणेरकर

उद्योग, उन्मेष, उल्हास, उमेद, उत्साह आणि त्या साऱ्यांच्या पाठीशी उभी राहणारी स्वप्नशक्ती म्हणजे तारुण्य! तरुणाला वय असलं आणि ते कदाचित वर्षांच्या परिभाषेत मोजता येत असलं तरी तारुण्याला वय नसतं. तारुण्याला एकच गुण ठाऊक असतो—सतत तरुण असण्याचा! म्हणजेच वर सांगितलेल्या साऱ्या गुणसमुच्चयाने सूचित होणारी प्रकृती धारण करण्याचा! आणि म्हणूनच ह्या रंगीबेरंगी दुनियेच्या रंगमंचावर आपल्याला काही तरुण वृद्ध तर काही वृद्ध तरुण भेटतात. मग ध्यानी येते की, तारुण्य ही एक 'प्रकृती' आहे, तो एक धर्म आहे, तो एक 'स्वभाव' आहे. फुलाने फुललंच पाहिजे, सुगंधाची उधळण केलीच पाहिजे, आणि त्याने ईश्वर आणि माणूस यांचं नातं जोडणारा दुवा बनलंच पाहिजे. त्याचप्रमाणे तारुण्याने उल्हसित राह्यलंच पाहिजे. त्याने उद्योगशील असलंच पाहिजे. त्याने स्वप्नांचा वेध घेत वेड्यासारखं आयुष्य काढलंच पाहिजे. स्वप्नशक्ती गेली की तारुण्य संपलं. उद्यमशीलता संपली की 'कज्जलकेश' लाभूनही ध्वज—जरा दिसो लागली म्हणून समजायला हरकत नाही. पण मस्तकी रुपेरी झेंडे धारण करूनही काही माणसे जेव्हा तरुणाच्या उत्साहाने, उमेदीने, स्वप्नाळूपणाने उद्यमशील राहिलेली दिसतात तेव्हा ध्यानी येते की, ही रुपेरी ध्वजा ही शरणागतीची ध्वजा आहे. तिथे वृद्धत्व शरण आले, जरा नत झाली आणि निराशा, उद्वेग, अगतिकता यांनी काळे तोंड केले—

असाच एक वृद्ध युवा मला भेटला. तसा अलिकडेच भेटला असेच म्हणायला हवे, पण जडलेले नाते मात्र अलिकडचे नसून कदाचित गतजन्माचे असावे असे वाटू लागले आहे. (गतजन्म व पुनर्जन्म ह्या दोन्ही गोष्टींवर माझी श्रद्धा आहे हे नम्रपणे नमूद करतो) त्या वृद्ध युव्याचे नाव आहे **सीताराम गणपति मणेरकर** वय—फेब्रुवारी १९७० त सत्त्याहत्तर पूर्ण होऊन अठ्ठ्याहत्तराव्या वर्षात पदार्पण केले आहे! परंतु त्यांच्या सहवासात तासन्तास घालविल्यानंतर आणि नुसतं मुकाट्याने बसून त्यांचे सतत, निष्ठेने, मूकपणे चाललेले उद्योग पाहिले की, त्यांचं वय आपण चटकन विसरून जातो आणि क्वचित आपल्याही वयाचा व वेळाचा विसर पडतो. ही अतिशयोक्ती वाटेल. पण ती अतिशयोक्ती नाही. ह्या वयातही मणेरकरांना रस्त्याने हिंडता फिरताना आधाराला काठी लागत नाही. मुंबईच्या भाऊगर्दीतही रस्ता पार करताना सोबत लागत नाही. नीट दिसावे म्हणून उपनेत्र (चष्मा) लागत नाही. त्यांचा आवाज अजूनही कापत-थरथरत नाही. तो खणखणीत आहे. वाणी स्वच्छ आहे. बोलणे खास गोमंतकीय 'टोन'चे असले तरी मराठीवर त्यांचे चांगले प्रभुत्व आहे. भाषा संस्कारित आहे. ह्या वयातही त्यांच्यातले लाजाळूचे झाड वठले, करपले नाही. त्यांच्या मनातला बुजरा—संकोची ससा अजूनही अंग चोरू शकतो. त्यांच्या मनातली कविता अजूनही स्वप्नात रंगू शकते आणि गळा उरला नसला तरी त्यांचे सुरांचे वेड अजूनही कायम आहे. अजूनही त्यांचे मन रागात रमते, लयीत दंगते आणि तृप्तीतल्या अतृप्तीत आणि अतृप्तीतल्या तृप्तीत धुंदही होते. अजूनही त्यांचे खाणारे दात शाबूत आहेत आणि नियमितपणा, निर्व्यसनीपणा, निश्चित आहार, आसन-नमस्कारादि व्यायाम ह्यामुळे त्यांनी आपले शरीरही चिवट—काटक राखले आहे. लालसर निमगोरा रंग, सरळ नासिका, भव्य कपाळ, नाजुक





अनुक्रमणिका

जिवणी आणि चेहऱ्यावर सतत विलसणारे स्मित ह्यामुळे ह्या वृद्ध युव्याच्या सहवासात आम्ही पुन्हा पुन्हा तरुण होतो असा माझा अनुभव आहे.

पण मणेरकर यांच्या साऱ्या उद्योगांच्या पाठीशी एक निष्ठा आहे, पद्धत आहे, केवळ उद्योगासाठी उद्योग म्हणून केलेले ते उद्योग (खरं म्हणजे धंदे) नाहीत. धंद्यावरून स्मरण झाले. मणेरकर मूळ म्हापशाचे, गोमंतकीय. त्यांचा व्यापार-उदीमाचाच वंश ! जात – वैश्य! गोव्यात त्यांचे जनरल स्टोअर्स होते. ते स्टोअर १९४० सालपर्यंत चालवीत होते. १८९३ सालच्या फेब्रुवारी महिन्यात त्यांचा जन्म झाला. शिक्षण त्यामानाने कमी—बेतास बात. मराठी चार इयत्तांपुरते. पोर्तुगीज भाषेतलेही काही. व्यापाराला दृष्टी लागते. लौकिक शिक्षण लागत नाही. मणेरकर यांच्याजवळ लौकिक अर्थाचे शिक्षण नाही. आणि माझ्या मते (वैश्य असूनही) वैश्यवृत्तीही नाही. त्यामुळे त्यांनी लौकिक अर्थाने अव्यापारेषु व्यापार बरेच आणि बरेच चांगले केले असले तरीही त्यांनी व्यापार केला नाही. तुकारामाप्रमाणेच 'वैश्य' नसलेला हा वैश्य वाणी आहे.

## रंगभूमीचे जबरदस्त वेड

व्यापाऱ्यांना नाटकांचे वेड असते. ही "धनिक वणिक बाळे" पुष्कळदा नव्या नाटकांच्या पहिल्या प्रयोगाला पहिल्या, दुसऱ्या रांगेत दिसतात. पण मणेरकर यांचे नाटकाचे वेड इथेच थांबले नाही, थांबत नाही (आजही) !! तोंडाला रंग फासला की, तो जन्मभर पाठ सोडत नाही असं म्हणतात. मणेरकर यांनी वयाच्या सहाव्या वर्षी रंग फासला आणि आज सत्तर वर्षांनंतरही त्या रंगाने (व रंगभूमीने) त्यांची पाठ सोडलेली नाही. गोमन्तक ही कलेची स्वप्न-भूमी. तेथे गावोगाव, देवाळयातून, उत्सवाच्या निमित्ताने नाटके सादर करण्याची परंपरा फार जुनी! त्यामुळे लहान वयात कौतुकाने ( व क्वचित कुणाच्या आग्रहाने वा गरज म्हणून ) रंग फासून बालनट होणारे पुष्कळ ! परंतु त्या रंगाचे इमान मनात ठसवून घेऊन ते सत्तर वहात्तर वर्षे निष्ठेने जपणारा मणेरकरांसारखा बालनट विरळाच!! इ. स. १८९९ त (वय वर्षे सहा) त्यांनी 'मृच्छकटिक' ह्या नाटकात रोहसेनाची संगीत भूमिका केली. सहा वर्षांच्या मुलाला रंगभूमी, निष्ठा, रंगभूमीचा उद्धार, सेवा वगैरे कल्पना कळत असतील का कळल्या असतील असे मानण्याचा भाबडेपणा माझ्यात नाही; परंतु त्यानंतर त्यांनी सतत १९३३ पर्यंत रंगमंचावर विविध कामे केलेली पाहिली व नाटके लिहिण्याचा केलेला प्रयत्न पाहिला की, निदान त्यांच्याबाबत तरी 'रंगमंच' हा एक 'अपघात' वा 'केवळ 'योगायोग' नसून तो एक 'योग' वाटतो. ती एक ईश्वरी 'देन' वाटते. आणि 'कलावंत जन्मावाच लागतो' ह्या सिद्धांतावर मनोमन श्रद्धा जडते.

त्यानंतर मणेरकर यांनी बालनट म्हणून सर्वदमन (शाकुंतल-१९००) जयंत (शारदा–१९०२) महादेव–गोप्या (तुकाराम–१९०३, ०४) बलसिंह (बलसिंह तारा–१९०४) बेटा गुलाब (राणा भीमदेव–१९०५) बकुल (वीरतनय–१९०५) रोहिदास

श्री. मणेरकरांनी भगवद्‌गीतेवरून आपल्या कल्पनेने तयार करून घेतलेल्या कलाकृती.



मोहग्रस्त अर्जुन



मोहनष्ट अर्जुन



विश्वरूप दर्शन

(हरिश्चंद्र–१९११) आदि नाटकातून भूमिका केल्या. त्यातल्या काही संगीत भूमिका होत्या.

## स्त्री-भूमिकाही गाजल्या

त्या काळात स्त्रियांच्या भूमिकाही पुरुषच करीत असत. त्यामुळे बाल नटातून वयपरत्वे स्त्रीभूमिकेत त्यांचे संक्रमण व्हावे हे स्वाभाविकच होते. मणेरकर यांचेही तसेच झाले. आजही त्यांची कांती तेजस्वी–तुकतुकीत आहे. ऐन तारुण्यात ते निःसंशय देखणे नसले तरी आकर्षक व्यक्तित्वाचे निश्चितच असावेत ह्याचा प्रत्यय त्यांच्या स्मितात, संकोचण्यात, लाजण्यात आजही मिळतो. त्यामुळे एक आकर्षक तरतरीत चेहऱ्याचा स्त्रीपार्टी नट म्हणून त्यांनी कीर्ती संपादन केली होती. त्यांनी केलेल्या स्त्री-भूमिकातल्या बऱ्याचशा संगीत भूमिका होत्या आणि संगीत पदांशी त्यांचे जे नाते जडले ते नातेच त्यांना 'वीर संगीत' हा आगळा ग्रंथ लिहिताना उपयोगी पडले असे म्हटल्यास वावगे ठरू नये. त्यांची 'स्त्री-भूमिका' पाहून काही तत्कालीन कंपनीवाल्यांनीही आपल्या कंपनीत येण्याबद्दल त्यांना पाचारण केले होते. १९०६ साली शाकुंतलमध्ये त्यांनी 'प्रियंवदेची भूमिका प्रथम केली. त्यानंतर सौभद्र (कुसुमावती–१९०८) शाकुंतल (कोकिळा–१९०९) उषा (चित्ररेखा–१९०९) धर्म-राज्यारोहण (द्रौपदी–१९१०) कीचकवध (सैरंध्री–१९१०) आदि भूमिका केल्या. त्यातून त्यांचा विश्वास वाढला. त्यांच्या अभिनय-गुणाची कसोटी लागली. आणि सौभद्र (रुक्मिणी–१९१६) राक्षसी महत्त्वाकांक्षा (मदालसा १९१७) शापसंभ्रम (महाश्वेता–१९०९) शिवविजय (राधा–१९१३) कंसकंदन (देवकी) आदि भूमिका त्यांनी समर्थपणे सादर केल्या. कंसकंदन नाटक पहायला किर्लोस्कर नाटक मंडळीचे लोक मुद्दाम गेले होते. त्यांना ते नाटक फार आवडले. मणेरकर यांच्या देवकीच्या भूमिकेचे त्यांनी खास कौतुक केले.

कलेची हौस, जाण वाढत असते तसेच माणसाचे वयही वाढत जात असते. ती जाण वाढली की, वयपरत्वे भूमिका बदलत जातात. मग भूमिका वाढतात. दायित्व वाढते आणि अपेक्षाही वाढतात. त्या वाढत्या अपेक्षा जे पूर्ण करू शकतात त्यांना कलेच्या क्षेत्रात स्थान राहते. वाकीची माणसे स्थानभ्रष्ट होतात. बालनट, स्त्री पार्टीनट म्हणून मणेरकरांनी जाण व्यक्त केली होती. गुण दाखवले होते. अपेक्षा वाढविल्या होत्या. म्हणून मग मोठ्या, महत्त्वाच्या व दायित्व टाकणाऱ्या पुरुष भूमिका त्यांच्या वाट्याला आल्या. हरिश्चंद्रमधील- हरिश्चंद्र (१९१३) शिवविजयमधील संभाजी (१९१३) कंसकंदनमधील कृष्ण (१९१३) चक्रव्यूहमधील अभिमन्यू (१९१२) चंद्रहासमधील चंद्रहास (१९१३) बाजी देशपांडेमधील अफझलखान (१९१४) कीचकवधमधील कंक (१९१८) भीमदेवमधील घोरी (१९१९) 'श्री'मधील श्रीकांत (१९२६) रक्तरंगण (संभाजी १९३१) आणि स्वलिखित हर्षकाळ नाटकातील हर्षवर्धन (१९३३) आदि भूमिका त्यांनी गाजविल्या. कुठे व केव्हा थांबावे हे माणसांना पुष्कळदा कळत नाही. मग माणसे रेंगाळत राहतात व चेष्टा-टिंगलीचा ते विषय बनतात. किंवा कीवेचा तरी बनतातच! इतरांच्या नाटकात भूमिका करीत करीत सतत पंचवीस वर्षे कामे केल्यावर आपल्याच नाटकातील भूमिका करून मणेरकर यांनी रंगमंचावर कामे करणे सोडले. आपण नाटक लिहिले, त्याला स्वातंत्र्यवीर सावरकर यांची प्रस्तावना लाभली, त्यातली प्रमुख भूमिका आपण केली आणि निवृत्त झालो ह्या साऱ्याच घटनांबद्दल मणेरकरांना समाधान वाटते. मणेरकर हे मनाने कुठल्याही राजकीय पक्षाच्या 'चवन्नी' चौकटीत बसले नसले तरीही वृत्तीने ते राष्ट्रनिष्ठ आहेत. 'इतिहास-निसर्गमाने' ती निष्ठा त्यांना लाभली आहे. राष्ट्रीय कीर्तनकार डॉ. पटवर्धन यांना ते गुरु मानतात. मसूरकर महाराज यांनी केलेल्या शुद्धीकार्याबद्दल त्यांच्या मनात आदर आहे. आणि सावरकरांनी अंदमान व नंतर केलेल्या शुद्धी-संघटनकार्याबद्दल त्यांच्या मनात भक्ती आहे. त्यामुळेच रत्नागिरी येथे स्थानबद्ध असलेल्या सावरकरांना ते आवर्जून जाऊन भेटले व त्यांनी त्यांची प्रस्तावना मिळविली. १९३३ सालची ही प्रस्तावना पुस्तकात ग्रथित करण्यात आलेली आहे. 'हर्षकाळ'च्या प्रस्तावनेत सावरकर यांनी मणेरकर यांच्या विषय-निवडीबाबत कौतुक केले असून इतिहासाशी प्रामाणिक राहून लेखन केल्याबद्दल अभिनंदन केले आहे. ही प्रस्तावना मिळविण्यासाठी मणेरकरांनी त्या काळी जे धाडस दाखविले त्याची सुरस-कथा त्यांच्याच तोंडून ऐकण्यासारखी आहे. निष्ठेशिवाय, श्रद्धेशिवाय हे घडते ना! महाराष्ट्र, मराठी भाषा, मराठी संस्कृती यांचा त्यांना अभिमान असून गोमंतकाचा व मराठीचा किती जुना संबंध आहे हे सुचविणारी नवीन माहिती त्यांनी मला परवा सांगितली. सध्याच्या कोकणी–मराठी वादाच्या पार्श्वभूमीवर ती माहिती महत्त्वाची ठरावी अशीच आहे.

"गोमंतकाची भाषा मराठीच हे आमच्या पैकी काही माणसं नाकारीत असले तरी परक्या पोर्तुगीजांनीसुद्धा ती गोष्ट मान्य केली होती. ह्याचा पुरावा म्हणून १०० वर्षांपूर्वीचे एक, शिक्षण-क्रमात समाविष्ट असलेले मराठी पाठ्यपुस्तक उपलब्ध झाले आहे. मराठी भाषा ही पोर्तुगीजांनी मान्य केली होती ह्याचा आणखी एक पुरावा म्हणजे सरकारी गॅझेटे ही फक्त पोर्तुगीज व मराठी भाषेतच प्रसिद्ध होत होती."

## शिक्षणप्रेमी समाजसेवक

मणेरकर यांच्यातला अस्सल मऱ्हाठी माणूस आणि एक संशोधक बोलत होता. परंतु मणेरकर हे केवळ नट नाहीत, संगीत नट नाहीत. संशोधक नाहीत तर ते मुळात एक शिक्षणप्रेमी समाजसेवक आहेत. ह्या साऱ्या गोष्टींच्यामागे मला तरी निदान एकच प्रेरणा दिसते. ती आहे एक सतत उद्योगशील राहणाऱ्या, धडपड्या तारुण्याची! व्यक्तिगत आयुष्यात सुखदुःखे तर साऱ्यांच्याच वाट्याला येत जात असतात. तशी ती मणेरकरांच्याही वाट्याला आली. लहानपणीच चुलत्यांना दत्तक जावे लागले. त्यामुळे प्रत्यक्ष माता-पित्यांचा विरह वाट्याला आला. तेही छत्र फार काळ टिकले नाही. लहान वयात संसाराचे दायित्व शिरी पडले. नातेवाईक मोठे मजेशीर असतात.

अनुक्रमणिका






अशावेळी त्यांचा स्नेह, दिलासा हवा असतो. पण तो बहुधा लाभत नाही. कारण प्रेम-प्रीती भावनात्मक असली तरी त्या प्रीतीलाही रुपेरी आवाज कळतो. आवाहन समजते. परंतु हे सारे भोगत असताना मणेरकरांनी स्वतःच्या मनाला कधी एकाकित्व येऊ दिले नाही. कर्मयोग कधी सोडला नाही. वैयक्तिक व्यथा वेदनांवर जेव्हा मात करता येते तेव्हा जीवनाचा खरा, व्यापक अर्थ समजतो. समाजाच्या सुखदुःखात ते बुडवून टाकणे शक्य होते. मणेरकर यांनी कलासाधनेबरोबर शैक्षणिक संस्थेच्या माध्यमातून मराठी भाषेची व शिक्षण क्षेत्राची मौलिक सेवा केली आहे. गोमन्तकातील ज्ञानप्रसारक विद्यालय ह्या संस्थेचे ते सतत चौदा वर्षे कार्यवाह होते. ज्ञानप्रसारक विद्यालयाच्या आर्थिक थैर्यासाठी त्यांनी ज्या पद्धतीने पैसा उभा केला ती पद्धत मला अभिनव वाटली. कुणाहीकडे प्रत्यक्ष द्रव्य न मागता 'एक मूठ तांदूळ' मागायचे. आणि ते तांदूळ विकून संस्थेसाठीं द्रव्य उभे करायचे अशी ती योजना होती. त्या योजनेला 'धर्ममूठ योजना' म्हणून संबोधित असत. ह्या संस्थेची स्थापना १९०८ साली झाली व १९६८ साली तिने साठ वर्षे पूर्ण केली आहेत. यंदाचे वर्षी बहुधा तिचा हीरक महोत्सव साजरा होईल. त्या निमित्ताने "गोमंतकाने मराठी भाषेसाठी काय केले" ह्या विषयाच्या अनुषंगाने एक प्रदर्शन भरविण्याचा मणेरकरांचा मानस आहे. त्यासाठी जमा केलेली पुस्तके, मासिके, छायाचित्रे, जाहिराती, कार्यक्रमपत्रिका आदि साहित्य त्यांनी साक्षेपाने जमविलेले आहे. 'धर्ममूठ योजना' १९४७ साली बंद करण्यात आली. सतत 'चाळीस वर्षे.' ह्या योजनेतून एक प्रचंड शिक्षण कार्य उभे राहीले, करता आले, ही गोष्ट निःसंशय कोतुकास्पद !!

## मणेरकरांचा अजब वस्तुसंग्रह

मणेरकर यांनी कलासाधनेबरोबरच भावी पिढ्यांसाठी, संशोधक अभ्यासकांसाठी एक महत्त्वपूर्ण संचय करून ठेवला आहे. असल्या काही वेड्या माणसांच्या वेड्या व कहीशा लोकविलक्षण वाटणाऱ्या छंदातूनच उगवत्या पिढ्यांना ज्ञान-विज्ञानाचे प्रकाशकिरण दिसत असतात. अकरणात्मक (निगेटिव्ह) व अश्रद्ध (सिनिक्) माणसे जगाला काही देऊही शकत नाहीत. उलट स्वतःचे असलेले गमावून बसतात. मणेरकरांमधल्या छांदिष्ट पण सश्रद्ध माणसाने (वैश्य म्हणून) धनसंचय केला नसला तरी त्यांचा ज्ञानसंचय मोठा आहे. त्यांच्या संग्रहात इ. स. १५९५ मधील गोमंतकाचा अस्सल व अधिकृत नकाशा आहे. इ. स. १८३१ मधील 'जुने गोवे' शहराचा नकाशा, इ. स. १५८३ मध्ये लिलाव चौकामध्ये हिंदु स्त्री पुरुषांचा ज्या पद्धतीने लिलाव केला जात असे त्याची कल्पना देणारे रेखाचित्र, इ. स. १७९७ मध्ये बांधण्यात आलेल्या श्री शांतादुर्गा मंदिराचे (संस्थान-धारगळ) पोर्तुगीज प्रवासी लोपिसमेद याने १८६३ मध्ये काढलेल्या रेखाचित्राचे छायाचित्र, १८६३ मध्ये झालेल्या 'रावणपराक्रम' ह्या ताकडधुम नाटकाच्या प्रयोगाचे रेखाचित्र, अनेक गोमंतकीय नट, नाटककार, वादक आदींची छायाचित्रे, जुन्या



## षड्ज

[मनास एक प्रकारचे पवित्र समाधान वाटू लागले की. कारागृहाचे दार आता दहा बारा वर्षांनी पुन्हा उघडणार; तेव्हा त्या शेवटच्या दिवशीचे आमचे शेवटचे कृत्यही तेच होते, की जे करण्याचे व्रत वयाच्या अकराव्या वर्षी अंगिकारिले होते.]

माझ्या हृदयाच्या वीणेला
साऱ्या तारा एकाच सुराच्या
देशभक्तीच्या षड्जाच्या ॥

नको त्याला आस कशाची
पंचमाची, निषादाची,
गंधाराची, मध्यमाची ॥

जरी कोणी छेडला दुसरा सूर,
तरी त्याच्या लहरी जातात विरून,
देशभक्तीच्या मंद्र षड्जात ॥

जेव्हां मी तो षड्ज छेडला
तेव्हां शत्रू भयभीत झाला
कारागारात त्याने टाकले मला ॥

हातातली वीणा घेतली हिसकावून
तारा तिच्या टाकल्या पिळवटून
वाटले त्याला वीणा मोडली म्हणून ॥

जेव्हां मी बाहेर आलो पुन्हा
जोडून तारा छेडली वीणा
आले आनंदाचे उधाण मना ॥

वीणेमधून होता झंकारव
भोवतालचे विश्व भारून टाकत
तोच देशभक्तीचा मंद्र षड्ज ॥

— र. मं. भागवत



अनुक्रमणिका

नाटकांची हस्तलिखिते, त्यांचे जन्म-मृत्युदिन विषयक टिपण, जुन्या नाटकांचे प्रयोग-दिनांक, त्यावेळी काढण्यात आलेल्या जाहिरातींचे नमुने व मूळ जाहिराती, १८९२ ते १९४० या काळात गोमंतकातील मराठी रंगभूमीवर कामे करणाऱ्या नटांची, रंगविशारद, संगीतकारांची नावे, नेपथ्यादि काही साधने त्यांच्या संग्रही आहेत. इ. स. १७३८ पासूनची पंचांगेही त्यांनी जपून ठेवली आहेत. सुमारे ८००० रु. ची पुस्तके त्यांच्या वाचनालयात आहेत. त्यात धर्म, इतिहास, अध्यात्म, ज्ञानकोश, चरित्रकोश, नाट्य, संगीतादि विविध प्रकारची पुस्तके आहेत. विशेष म्हणजे ह्या साऱ्यांची संपूर्ण सूची आहे. त्या सूचीतला तपशीलही मजेशीर आहे. निदान आजतरी तो मजेशीर वाटतो. पुस्तक कुठे घेतले, काय किंमत दिली वगैरे ! त्या 'किंमती' पुस्तकाच्या त्या काळच्या किंमती पाहिल्या की आजच्या पुस्तकांच्या किंमतीबाबतची तफावत काहीशी अंतर्मुख करून जाते. ही ग्रंथसंपत्ती त्यांनी नुसती जतन केली नाही. वाचली, पचवली. त्यावर विचार-चिंतन केले आणि ते विचार त्यांनी आपल्या पद्धतीने लिहून काढले. असे विपुल पण अप्रकाशित लेखन त्यांच्या दप्तरी आहे : त्या अभ्यास मननातून व जिद्दीतून त्यांनी एक महत्त्वपूर्ण गोष्ट साधली आहे. वस्तुतः मणेरकर हे काही संस्कृतज्ञ वा अध्यात्माचे व्यासंगी अभ्यासक नव्हेत. परंतु ज्ञान आणि लौकिक शिक्षण यांचा नेहमीच सम संबंध असतो असं नाही. मणेरकर यांनी श्रीमद्भगवद्गीता नुसती वाचली नाही. पुराणिक बुवांच्या 'ऐहिक' निष्ठेने पाठही केली नाही. तर त्यांच्या व्यग्र आणि व्यस्त मनाला त्या ग्रंथात दिलासा लाभला, तृप्ती लाभली, कर्मयोगाला तेथे योगेश्वर भेटले आणि "डॉ. पटवर्धन यांचा अनुग्रह, गत जन्मीचे काहीतरी पुण्य यामुळे मला हा कर्मयोग साधला" असं ते आपल्या "वीर संगीत वा भगवद्गीता संगीतामृत" ह्या आगळ्या प्रयत्न-प्रपंचाबद्दल म्हणतात. हा त्यांचा प्रयत्न मराठी वाङ्मयात सर्वस्वी नवीन असा आहे. सतत पंचवीस–तीस वर्षे त्यांचा नाट्याशी व नाट्यसंगीताशी संबंध आला. अनेक नाटकातील अनेक गाणी त्यांनी म्हटली. आजही ती त्यांना स्मरतात. ते गुणगुणतातही. 'भगवद्गीता'र्थ जनसामान्यांना कळावा म्हणून श्री ज्ञानेश्वरांनी 'ज्ञानेश्वरी' लिहिली. तर सुरवेड्या जनसामान्यांना, नाटकवेड्या मराठी माणसांना तोच गीतार्थ पदांच्या माध्यमातून सांगण्याचा प्रयत्न त्यांनी केला आहे. गीता–महाभारताचे अध्ययन त्यांनी मनापासून केले असून महाभारत काळ, महाभारतातील अत्यंत महत्त्वपूर्ण घटनांचे दिनक्रम वेळ, भीष्म, द्रोण, कृष्ण–पांडवादि मंडळाची युद्धकालीन स्थिती, त्यांचं वय आदि बाबतचा सारा तपशील त्यांनी लेखरूपाने लिहून काढला आहे.

## वीस वर्षांच्या साधनेचे फळ

प्रस्तुत 'वीर संगीत' वा 'भगवद्गीता संगीतामृत' ही मणेरकर यांची साधना वीस वर्षांची आहे. १९४५ साली त्यांनी हा प्रचंड उद्योग सुरू केला आणि १९६५ साली संपविला. ह्या काळात ते मुंबईत स्थायिक झाले होते. अंधेरीला एका जर्मन मालकीच्या औषधी कारखान्यात काम करीत होते. त्या कंपनीत त्यांनी १८ वर्षे तीन महिने नोकरी केली. एकही दिवस खाडा न करता केली. नौकरीच्या काळात त्यांनी कारखान्याची एकही बाटली फोडली नाही. नीटनेटकेपणा, शिस्त, प्रामाणिकता, ह्या गुणांनी ते तेथे लोकप्रिय झाले होते. पण त्या नौकरीच्या काळात त्यांना खरा 'कर्मयोग' शिकवला तो मात्र गीतेने! नौकरी करून आल्यावर त्यांनी (त्यावेळी ते दादरला रहात) नेमाने पदरचना केली. आन्हिक म्हणून ही गीता पूजा बांधली. "आणि मी तृप्त होत गेलो. मुक्त होत गेलो" असं ते म्हणतात. ह्या ग्रंथासाठी त्यांनी त्या प्रसंगाला साजेशी अशी तीन सुंदर चित्रे सुप्रसिद्ध गोमंतकीय चित्रकार वासुदेवराव दिवकर यांजकडून काढून घेतली आहेत. त्या चित्रात श्रीकृष्णांना दाढी– आणि तीही पांढऱ्या रंगाची–अशी काढण्यात आली आहे. त्याबाबत विचारता मणेरकर म्हणाले, "महाभारताचे युद्ध झाले त्यावेळी श्रीकृष्ण ८३ वर्षांचे होते. भीष्म, द्रोणाचार्य, कृपाचार्य आदि मंडळींना त्यांच्या वयानुरुप दाढ्या होत्या. श्रीकृष्णालाही ती असली पाहिजे अशी माझी धारणा आहे. आणि आपल्याकडे सर्वच देवांना दाढी मिशा न दाखवता चिर-तरुण वा चिर–बाळ दाखविण्याची जी पद्धत आहे तीत फारसा अर्थ आहे असे मला वाटत नाही." दिवकरांनी ते चित्र फार सुरेख काढले आहे. जीवनाचे श्रेष्ठ तत्त्वज्ञान सांगणारे श्रीकृष्ण 'योगेश्वर' वाटतात.

'वीर संगीता'ची कल्पना त्यांना डॉ. पटवर्धन यांच्याशी झालेल्या चर्चेतून सुचली. डॉ. पटवर्धन हे स्वतः प्रयत्नवादी गृहस्थ होते. त्यांची प्रेरक, तेजस्वी वाणीतली कीर्तने मी ऐकली आहेत. 'यत्न तो देव जाणावा' ही श्रद्धा बाणून घेऊन काम करणारा तो गृहस्थ होता. 'कर्मयोग हवाच, कर्मभोग मात्र प्राक्तन, पूर्वकर्मातून येत असतो. ह्या दोन्हीही गोष्टींकडे समबुद्धीने पहायला शिका अशी पटवर्धनांची शिकवण होती. तिचे तंतोतंत आचरण करीत राहून मणेरकरांनी आनंद, तृप्ती मिळविली आहे. कर्मयोग साधला आहे. वीर-संगीत ह्या संगीत–गीतेतील आणखी एक विशेष म्हणजे त्यांनी एखादाच अध्याय पदबद्ध न करता अठरा अध्यायांची अवघी गीताच पद्यबद्ध केली आहे. हा प्रयत्नच मुळात ह्या माणसाच्या प्रयत्नशीलतेची, उद्यमशीलतेची उंची दाखवून जातो. वीस वर्षे, ध्यास लावून घेऊन त्यांनी ही गीता-धर्म सेवा केली आहे. त्यातूनच कदाचित त्यांना आजची शांती, आजची 'सम' भावना गवसली असावी. हे 'वीर संगीत प्रचंड आहे. त्याची झलक म्हणून काही पदे खाली देत आहे. हे देताना काही प्रमुख अध्यायांचा व लोकप्रिय पदांचा मुद्दाम वापर करीत आहे.

**अध्याय आठवा**

**मूळ श्लोक : किंतद्ब्रह्म किमध्यात्मं [ मृच्छकटिक–चाल तेवि पुरुष दैवाचे. मालकंस-त्रिताल ]•**

काय स्वरुप ब्रह्माचे ।। सांग सांग मज साचे ।। धृ ।।
हे पुरुषोत्तम मम मति भ्रमुनी । अथांग जळि नर
जाई बुडुनी । तेवि विषय अध्यात्म न उमजुनी ।
कर्मकृती ही येइ न समजुनी । सांग अर्थ यांचे ।। १ ।।

( पृष्ठ २४ पहा )



# कै. दादासाहेब फाळके

## भारतीय चित्रपट महर्षी

**भारतातील चित्रपटसृष्टीचे आद्य निर्माते कै. दादासाहेब फाळके यांची जन्मशताब्दी गेल्याच महिन्यात साजरी झाली त्यानिमित्त ही त्यांना श्रद्धांजली . . .**

भारतीय चित्रपटसृष्टीचे पितामह श्री. दादासाहेब तथा धुंडिराज गोविंद फाळके यांनी वयाच्या वेचाळीसाव्या वर्षी चित्रपटासारख्या नव्या धंद्याचे बीजारोपण केले. वयाच्या चौऱ्याहत्तराव्या वर्षी दादासाहेब परलोकवासी झाले. म्हणजे चित्रपटधंद्याचे बीजारोपण केल्यावर सुमारे बत्तीस वर्षे दादासाहेब जिवंत होते. ह्या बत्तीस वर्षांपैकी पहिली आठ वर्षे, म्हणजे इ. स. १९१९–२० पर्यंत, दादासाहेब कार्यमग्न होते. इ. स. १९१८ मध्ये 'फाळकेज फिल्म्स लि.' दादासाहेबांना बंद करावी लागली. आणि नंतर पाच भागीदारांच्या साहाय्याने दादासाहेबांनी 'हिंदुस्थान फिल्म कंपनी'ची स्थापना केली. या नव्या कंपनीसाठी दादासाहेबांनी 'कालिया मर्दन' आणि 'श्रीकृष्ण जन्म' असे दोन चित्रपट निर्माण केले. आणि यानंतरच दादासाहेबांच्या कारकीर्दीला उतरती कळा लागली.

चित्रपटसृष्टीच्या रौप्यमहोत्सवाच्या वेळी म्हणजे इ. स. १९३९ साली, 'सण्डे टाईम्स' या इंग्रजी वृत्तपत्राने दादासाहेबांची खास मुलाखत प्रसिद्ध केली होती. या मुलाखतीत फाळके फिल्म्सचे हिंदुस्थान फिल्म कंपनीत रूपांतर झाल्यावर, "Though I went on producing films it proved a most uneventful career for me, owing to many reasons. And for full fifteen years following 1918, I led practically an 'empty life' in the film production. This long spell broke with the appearance of 'Sethu Bandhan', a synchronised picture in 1933. And with 'Gangavataran' for Kolhapur Cinetone I cried a halt and quitted the field two years ago" असे म्हटले आहे. आणि हे अगदी खरे आहे. त्यामुळेच इ. स. १९२० नंतरचा काळ

पुरुषोत्तम बावकर

चित्रपटनिर्मितीच्या दृष्टीने उतरतीचा काळ आहे असे म्हणणे वावगे ठरणार नाही.

कालिया मर्दन चित्रपटाच्या निर्मितीपूर्वी आणि नंतरही दादासाहेब आणि त्यांचे हिंदुस्थान फिल्म कंपनीतले धनाढ्य भागीदार ह्यांच्यात वारंवार तेढ निर्माण होऊ लागली. कंपनीच्या धोरणाबद्दल दादासाहेब आणि भागीदार यांच्यात मतभेद निर्माण झाले. ते विकोपास गेले की त्यातून अनेक कटकटी निर्माण होत. मतभेदाची कारणेही खूप असत. 'लंका दहन' या चित्रपटाने एक उत्तम बाजारपेठ निर्माण केली होती. त्याने अफाट लोकप्रियता मिळवली होती. ह्या चित्रपटाच्या आणि सोबत कालिया मर्दन आणि कृष्ण जन्म या चित्रपटाच्या प्रत्येकी छत्तीस प्रतींची मागणी वितरकांकडून आली होती. श्रावण-भाद्रपद महिन्यांकरिताची ही मागणी होती. पण त्यावेळी कंपनीत एकच प्रिंटिंग मशीन होते आणि ते रोजच्या कामासाठीसुद्धा अपुरे पडत होते. त्यामुळे वाढत्या मागणीला तोंड देण्यासाठी दादासाहेबांनी मुंबईच्या ऑफिसला एक नवा प्रिंटर खरेदी करून नाशिकला पाठविण्यास कळविले. मुंबईत नवीन प्रिंटर बाजारपेठेत असल्याची माहितीही दादांना कळली होती. पण प्रिंटिंग मशीन काही नाशिकला आले नाही, उलट कंपनीचे एक भागीदार श्री. मायाशंकर भट यांचे एक भाचे श्री. मोगीलाल दवे हे चित्रपटकलेचे शिक्षण घेण्यासाठी अमेरिकेला जात होते. त्यांच्याबरोबर तीनही चित्रपटांच्या निगेटिव्ह पाठवायचे ठरवले. स्वदेशात जर हे काम होत असेल तर अमेरिकेला निष्कारण पैसे खर्च करायला दादासाहेब तयार नव्हते. पण दादासाहेबांचा तीव्र विरोधही जुमानला गेला नाही.

यानंतर प्रत्येक गोष्टीमध्ये दादासाहेबांना विरोध होऊ लागला. दादांच्या








भागीदारांनी कॅप्टन रोव्हन नावाच्या एका अमेरिकन गृहस्थाला रु. १७००।– पगारावर हिंदुस्थान कंपनीचा मॅनेजर नेमले. अर्थातच दादासाहेबांना हे सहन झाले नाही. त्यांनी कंपनीच्या भागीदारीचा राजीनामा देण्याचे ठरवले. पण अनेक कायदेशीर अडचणी आड आल्या मुळे तेही त्यांना शक्य झाले नाही. त्यामुळे दादासाहेबांची मनःस्थिती बिघडली. त्यांना नवनिर्मिती शक्य होईना. ते विश्रांतीसाठी म्हणून सहकुटुंब काशीला गेले.

काशीला असताना दादासाहेबांनी 'रंगभूमि' हे नाटक लिहिण्यास सुरुवात केली. ते त्यांनी दोन तीन महिन्यात पुरे केले. ते पुन्हा नाशकाला आले आणि त्यांनी रंगभूमि नाटकाचे प्रयोग सुरू केले. श्री. बाळ गंगाधर टिळकांच्या मृत्यूअगोदर दादासाहेबांनी 'रंगभूमि नाटकाचे काही प्रवेश वाचून दाखवले होते. रंगभूमी नाटकाच्या प्रयोगात दादासाहेबांना बरीच खोट आली. त्यामुळे त्यांची मनःस्थिती आणखीनच बिघडली. पण इ. स. १९२३ मध्ये दादासाहेबांना हिंदुस्थान कंपनीत पुन्हा बोलावण्यात आले. तेथे ते इ. स. १९२७–२८ पर्यंत होते. त्यांनी या दरम्यान 'सती महानंदा' या चित्रपटाच्या निर्मितीच्या व्यतिरिक्त देखरेखीचेच काम केले. याचवेळी दादासाहेबांनी चित्रपटसृष्टीतून निवृत्त व्हायचे ठरवले.

## 'सेतुबन्धन'चे सुयश

दादासाहेबांनी जरी निवृत्त व्हायचे ठरवले तरी नेहमी नवीन काहीतरी करण्यासाठी धडपडणारे मन त्यांना स्वस्थ बसू देईना. किंगकाँग, इनव्हिजिबल मॅन या तोडीचा चित्रपट काढायचा त्यांच्या मनात होता. कालिया मर्दननंतर आलेली निष्क्रीयता जी दहा वर्षे टिकली होती, ती दादासाहेबांनी फेकून दिली आणि ते कामाला लागले. स्वतःचे पैसे खर्च करून त्यांनी 'सेतुबंधन' चित्रपटास सुरुवात केली. वास्तव दृष्यांच्या चित्रिकरणासाठी कलाकार घेऊन ते रामेश्वरम् येथे गेले. मूकपटांच्या जमान्यात सुद्धा या चित्रपटाला पाऊण लाख रुपये खर्च आला होता. सारा चित्रपट चमत्कार दृष्यांनी भरला होता. दादासाहेबांचे स्वप्न साकार झाले होते. मद्रासला चित्रपट लागला तेव्हा तिकीटविक्रीच्या बाबतीत चित्रपटाने उच्चांक गाठला. एकट्या मद्रासलाच चित्रपट निर्मितीचा खर्च वसूल झाला होता, पण इ. स. १९३३ साली मुंबईत तो चित्रपट दाखविण्यासाठी त्यांना एकही थिएटर सापडेना. मुंबई बोलपट युगाने केव्हाच काबीज केली होती.

मुंबईत सेतुबंधन चित्रपटासाठी थिएटर नाही असे समजताच दादासाहेबांना धक्का बसला. ज्याने चित्रपटनिर्मिती करायला भारतात सुरुवात केली, ज्याला चित्रपटसृष्टीचे पिताही म्हणतात, त्यालाच मुंबईत चित्रपट प्रदर्शनासाठी थिएटर मिळत नव्हते. केवढा हा दैवदुर्विलास! दादासाहेब निराश झाले नाहीत. त्यांनी आणखी चाळीस हजार रुपये खर्च करून तो चित्रपट, आर्देसिर इराणी यांच्या सल्ल्याने, त्यांच्याच इम्पीरियल स्टुडिओत 'डब' केला. त्याला त्यांनी बोलते केले. सुदैवाने प्रकाशनाच्या पहिल्याच आठवड्यात मॅजेस्टिकमध्ये या चित्रपटाने रु. १०,३०० मिळवून उत्पन्नाचा उच्चांक गाठला. बाकी इतर ठिकाणीही या चित्रपटाने उच्चांक गाठले. दादासाहेबांची इच्छा पूर्ण झाली होती. त्यांनी पुन्हा चित्रपट-संन्यास घेतला. आणि ते नाशकाला सिरॅमिकच्या फॅक्टरीत दंग झाले. आता त्यांना नवीन चित्रपट काढायचे नव्हते. थकल्याभागल्या शरीराला विश्रांतीची जरूरी होती. पण ती विश्रांती त्यांना मिळणार नव्हती असे दिसते. कोल्हापूरला 'शालिनी सिनेटोन' आणि 'कोल्हापूर सिनेटोन' अशा दोन कंपन्या होत्या. त्यापैकी कोल्हापूर सिनेटोन राजाराम महाराजांची होती. त्यांच्याकडून दादासाहेबांना चित्रपट दिग्दर्शनाबद्दल विचारणा आली. दादासाहेब त्यावेळी 'सिरॅमिक फॅक्टरी'च्या कामात गर्क होते. त्यांनी अर्थातच नकार दिला! कारण नाममात्र का असेना, हिंदुस्थान फिल्म कंपनीत तेवीस वर्षे मालकीपद उपभोगीत होते. कंपनीत त्यांचा दरारा विशेष होता. विडीतंबाखू, पानसुपारी खाऊनसुद्धा त्यांच्यासमोर जायची कुणाची हिंमत होत नसे. असे स्वातंत्र्य उपभोगलेल्या माणसाला दुसऱ्याकडे नोकर म्हणून राहणे कसे शक्य झाले असते ?

खूपच गळ घातल्यावर दादासाहेबांनी होकार दिला. त्याचे एक कारण म्हणजे हिंदुस्थान फिल्म कंपनीत तयार करायचा ठरवलेला बोलपट गंगावतरण, कोल्हापूर सिनेटोनने घ्यायचा ठरवला. दादासाहेबांनी या बोलपटाची तयारी करून ठेवली होती.

ढालीपुढे तलवार मोडली !




पुन्हा एकदा अविश्वासाचा ठराव बारगळला !

## 'गंगावतरण'ची तयारी

कोल्हापूर सिनेटोनमध्ये 'गंगावतरण' बोलपटाच्या चित्रिकरणास सुरुवात झाली आणि दादासाहेबांना अनेक अडचणीना तोंड द्यावे लागले. त्यामुळे गंगावतरण हा हिंदी-मराठी भाषेतला चित्रपट पुरा होण्यास अडीच वर्षे लागली. या बोलपटाच्या निर्मितीच्या वेळी दादासाहेबांचे वय पासष्ट वर्षांचे होते. ज्या वयात माणूस पेन्शनीत जाऊन आपल्या गतायुष्यातील आठवणी चघळत पुढील बोलावण्याची वाट पहातो त्या वयात संपूर्ण नव्या वातावरणात एक प्रचंड पौराणिक बोलपट निर्माण करण्याची जबाबदारी दादासाहेबांनी घेतली होती. वय, प्रकृति स्वास्थ्य आराम या गोष्टी दादांच्या कोशातच नव्हत्या! अभिनय, पटकथा, फोटोग्राफी, सेटिंग्ज वगैरे चित्रपटनिर्मितीच्या अंगोपांगातील त्यांचा अनुभव फार मोठा होता.

ट्रिक फोटोग्राफीमध्ये दादासाहेबांचा हात धरणारा अजूनहि कोणी नाही. सेतुबंधन आणि गंगावतरणातील ट्रिक्स म्हणजे लाजवाब आहेत. ह्या साऱ्या ट्रिक्स त्यांनी आपल्या जुन्या कॅमेऱ्यावर केल्या. अदृष्य माणूस, अवांतरी माणूस, आकाशात उडणारा व उडत असताना घवघव्याचे पाणी पिणारा माणूस, एका लहानशा रांजणातून गाणे म्हणत पडणारी व इशाऱ्यासरशी आत जाणारी माणसे, शंकराच्या जटेत अदृष्य होणारी गंगा, जटेतच अभंग म्हणणारी गंगा, यासारखे अनेक देखावे, ऑप्टिकल प्रिंटर स्पेशल ट्रिक कॅमेरा नसतानाहि दादासाहेबांनी चित्रित केले होते.

## 'जपानी पंख्या'ने हात दिला

गंगावतरण सहा ऑगस्ट १९३७ रोजी मुंबईला रॉयल ऑपेरा हाऊसमध्ये प्रकाशित झाला. त्यावेळी रॉयल ऑपेरा हाऊसमध्ये लागणारा हा पहिला देशी बोलपट. तो आर्थिकदृष्ट्याही यशस्वी झाला. वृद्धपणी अपयशाचा डाग नको म्हणून खडतर परिस्थितीतही दादासाहेबांनी बोलपट पुरा करून दिला होता. पण कराराप्रमाणे कोल्हापूरच्या महाराजांनी त्यांना पैसे दिले नाहीत. भग्न अंतःकरणाने दादासाहेबांनी कोल्हापूरचा मुक्काम हलवला.

कोल्हापूर सोडल्यावर दादासाहेबांची परिस्थिती खूपच हलाखीची होती. गंगावतरणचे यश पाहून इब्राहिम रहिमतुल्ला यांनी चित्रपट निर्मितीसाठी मदत करण्याची तयारी केली. पण प्रकृती अस्वास्थ्यामुळे दादासाहेबांनी नकार दिला.

दादासाहेबांची हलाखीची परिस्थिती पाहून प्रभात कंपनीने त्यांना मदत करण्याचे ठरविले. प्रभातने दादासाहेबांचे 'जपानी पंखा' हे कथानक विकत घेतले. या पैशातूनच दादासाहेबांनी सेतुबंधन चित्रपटाचे नवीन प्रिंट्स काढले. या चित्रपटाच्या उत्पन्नामुळे दादासाहेबांची आर्थिक परिस्थिती थोडी सुधारली.

भारतीय चित्रपटसृष्टीचा रौप्यमहोत्सव साजरा करण्यात आला तेव्हा कै. सत्यमूर्ती यांच्या अध्यक्षतेखाली दादासाहेबांचा सत्कार झाला. त्यांना पाच हजार रुपयांची थैली अर्पण करण्यात आली. यावेळी श्री. पृथ्वीराज कपूर यांनी दादासाहेबांना हात धरून व्यासपीठावर नेले, अत्यंत भावपूर्ण शब्दांत त्यांची ओळख करून दिली व चार शब्द बोलण्याची विनंती केली. दादांनी साऱ्यांना प्रणाम केला आणि "माझ्या प्रिय बाळांनो...", हे एवढेच शब्द दादासाहेबांनी उच्चारले. त्यांचा कंठ दाटून आला आणि डोळ्यांतून अश्रू वाहू लागले. त्या अश्रूंनी सारी कटुता, अवहेलना, दारिद्र्य पुसून गेले. राहिले ते त्यांचे चित्रपटसृष्टीवरील प्रेम. त्या रात्री दादासाहेब तीन वाजेपर्यंत खिडकीत उभे राहून आकाशाकडे पहात होते. कदाचित आपल्या गत आयुष्याचा चित्रपट ते पहात असतील !

दादासाहेबांना चाळीस साली मद्रास येथील चित्रपट निर्मात्यांनी बोलावून त्यांचा सत्कार केला. त्याचवेळी पुणे येथील आर्यन सिनेमाचा रजतमहोत्सव झाला. त्याचे अध्यक्षपद दादासाहेबांनी भूषविले.



### जब खुदा देता है !...

आमच्या गावात
असाही एक वेडा आहे,
की,
'जब खुदा देता है
तो छप्पर फाडफाडके
देता है, यावर
त्याचा भलता विश्वास
आहे.
आणि आपल्यावर
आपल्या छपरावर
तशीच काही पाळी
आलीतर खुदानं
दिलेलं नेमकं
आपल्याच घरात
पडावं, म्हणून
घराचे छप्पर
त्यानं आधीच
फाडून ठेवलं आहे !

—जयंत आंबेकर

याच थिएटरचे उद्घाटन 'राजा हरिश्चंद्र'ने झाले होते.

दादासाहेब १६ फेब्रुवारी १९४४ रोजी नाशिकला मृत्यू पावले. या वेळच्या त्यांच्या परिस्थितीबद्दल त्यांची मुलगी मंदाकिनी म्हणते, "Even on the death bed Dadasaheb remained mentally alert. Despite loss of memory, his dreams and aspirations, his zest for persuing new pastures, fresh avenues had not forsaken him. "I have big plans," he kept saying, "big ideas and dreams in mind—there is so much to do." ●●●

अनुक्रमणिका

## लोहगड ते लंडन [ ६ ]

# ऑस्लो : देवांचे उद्यान



—ह. सी. उर्सेकर

ॲडीशनल चीफ प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट

चाळीस वर्षे भाकरी टिकवून खाणाऱ्या कोळ्यांचा देश, नवऱ्याला संसाराच्या 'नंदनवना'च्या घराबाहेर घालवणारी नोरा निर्माण करणाऱ्या इब्सेनचा देश, तक्षशीला नाटकात पाहिलेल्या साहसी सागर-वीरांचा–व्हायकिंगांचा देश-नॉर्वे हा स्वीडनच्या-शेजारी पश्चिमेला आहे.

स्टॉकहोम पाहून दिवसभर दमल्याने रात्री आठलाच हॉटेल-मध्ये झोपी गेलो. आपसूकच पहाटे चारला जाग आली. पुन्हा सामान आवरणे, हॉटेल बिल चुकते करणे, टॅक्सी करून विमानवेशीवर जाणे – तेथून कोचने विमानतळावर प्रयाण. स्वीडीश क्रोनोरचे नॉर्वेजियन क्रोनोर करून घेणे वगैरे सर्व कार्यावळी यथासांग आटपून फिनएअरच्या विमानाने ८–१० ला निघून पश्चिमेकडे झेपावलो. पन्नास मिनिटात नॉर्वेची राजधानी ऑस्लो येथे पदार्पण केले.

युनिव्हर्सिटेट रस्त्यावरील प्रासादभव्य सॅव्हॉय हॉटेलात आधीच खोलीचे आरक्षण केल्याने उतरण्याची अडचण पडली नाही. युरोपच्या प्रवासात मला असा अनुभव आला की हॉटेलचे आगाऊ आरक्षण प्रवासी कंपन्यांद्वारे जरून करून ठेवल्यास फार सुखाचे होते. विशेषत: आपल्याला वेळ कमी असल्यास हॉटेल धंडण्यात कालहानी होत नाही. तो अमूल्य वेळ हॉटेल पहाण्यात हिंडण्यापेक्षा शहर पाहण्यात हिंडण्याकरता उपयोगात आणता येतो. प्रत्येक हॉटेलची 'उत्कृष्ट भोजन' ही शिफारस मात्र माझ्यासारख्या शाकाहारी लोकांना खरी वाटत नाही ! कारण ब्रेड, बटाटे, दूध, फळे यांना बबर्जीच्या हातापेक्षा वेटरचाच हातभार अधिक लागतो ! दुसरे म्हणजे शाकाहारी लोकांच्या बाबतीत ब्रेकफास्ट, लंच, डिनर या शब्दांना विशेष काही अर्थ राहत नाही. वर दिलेले पदार्थच कमी-अधिक प्रमाणात आलटून पालटून खायचे. स्वयंवरातील दिनेश्वर भटजी म्हणतो की आम्हा ज्योतिषांना वर्तमान, भूत आणि भविष्य हे तिन्ही काळ सारखेच. त्याच चालीवर मी म्हणेन की आम्हा शाकाहाऱ्यांना सकाळ, दुपार व रात्र हे भोजनकाल सारखेच !

मुंबईच्या एका मित्राने ऑस्लोचे ऑडेन ब्रूवाल या न्याय-मूर्तींना परिचयपत्र दिले होते. त्याच्या जोरावर न्यायमूर्तींची त्यांच्या चेंबरमध्ये जाऊन भेट घेतली. मुंबईसारखी कामाची गर्दी तेथे नसल्यामुळे मैत्रिणीला समंजस सासू मिळाल्यासारखा आनंद झाला. त्यांचे कोर्ट एका बहुमजली गगनचुंबीनीत आहे.

संध्याकाळी आमच्या हॉटेलवर येऊन भेटतो असे ब्रूवालसाहेब म्हणाले. माझीही नगरदर्शनी सुटण्याची वेळ झाली होती, तेव्हा कोर्टातून बसस्टॉपवर येऊन बसमध्ये स्थानापन्न झालो. दुपारी अडीच ते साडेपाच असा तीन तासांचा नगरदर्शनाचा कार्यक्रम होता. तिकीट होते पंचवीस नॉर्वेजियन क्रोनोर म्हणजे सुमारे पंचवीस रुपये. नेहमीप्रमाणे बसमध्ये पाऊल टाकताच वाटाड्याची धावती मल्लीनाथी सुरू झाली. इंग्रजी, जर्मन, फ्रेंच व स्वदेशी नॉर्वेजियन अशा चार भाषातली ती ज्ञानेश्वरी ऐकण्यात एक आगळाच आनंद वाटे. त्यात माहिती व मनोरंजन दोन्ही समप्रमाणात असे !

### भाषांतरातून देशांतरावर

माझी नॉर्वे देशाची प्रथम अक्षरओळख झाली ती तर्खडकरांच्या भाषांतराद्वारे नॉर्वे देशातील भाकर चाळीस वर्षे टिकते, यात 'टिकते'-चे भाषांतर Lasts शब्दाने करावे यापेक्षा उंटाच्या पोटातील पाणी अनेक महिने टिकते, त्याप्रमाणे नॉर्वेतील चिरंजीव भाकरी, दीर्घजीवी ! तेव्हा मोठेपणी एक उंट व नॉर्वेतील भाकऱ्या खरेदी केल्या की जन्मभर पोटापाण्याचा प्रश्न सुटला, ही एक बालसमजूत ! ते काही असो, परंतु इजिप्शीयन ममीची किमया अन्नावर करणाऱ्या देशाला आपण केव्हातरी भेट द्यावी अशी इच्छा मनीमानसी बाळगून होतो ! भाषांतरातून देशांतराचे विचार येतात ते असे !

फिनलँडप्रमाणेच मूळ आर्य लोकांची काही वस्ती नॉर्वेतही असावी. येथेही उत्तरेस मध्यरात्री सूर्यदर्शन घडते. सर्व लोक हाय-लँडरसारखे उंचेपुरे, रेखीव, बांधेसूद शरीरे, गोरेपान, सूटावर चटईची हॅट, त्यावर रंगीत पिसे... डोक्यावरील पिसे नाजूक असली तरी त्याखालील आदमी मात्र राकट, ताठ ! ब्रिटीशांप्रमाणे दर्या-वर्दी सागरी लोकांचा हा देश आहे. कॉड मासे मारणे हा एक प्रचंड उद्योग. जबरदस्त जंगले, तजेलदार तलाव, गर्द गिरीराजी व फिओर्ड ही नॉर्वेतील निसर्गसुंदरीची अहेवलेणी फिओर्ड (फिजोर्ड नव्हे)







अनुक्रमणिका

शब्द डडले स्टॅपच्या मगोल्यात गेलेला मॅट्रीकमध्ये असताना ! स्वीडनचा नकाशा पहा आणि नॉर्वेचा पण बघा. विशेषतः नॉर्वेचा पश्चिम किनारा फार दंतुर आहे. त्यात उत्तर सागराने ठिकठिकाणी आक्रमणे करून भूभागावर सुरामारी केल्यासारखे दिसते त्याच फिओर्ड ! दोन टेकडयांच्या खोऱ्यांमध्ये समुद्राचे पाणी खळाळत असते. त्यात मधूनच सूर्यबिंब आगगाडीमधील तिकीट-चेकरसारखे डोकावते केव्हातरी! फिओर्ड म्हणजे आक्रमक सागराचे मूवरील थैमान.

अशा या निसर्गरम्य देशाची राजनगरी म्हणजे ऑस्लो. आमच्या गाईडने सांगितले ऑस्लोचा अर्थ देवांचे उद्यान-नंदनवन. नाव अगदी यथार्थ वाटले. स्वीडन व नॉर्वे यांच्या सिंहमुखात वरोवर मधल्या दातासारखे ऑस्लोचे स्थान आहे. ही नगरी पाण-वठ्यावरील सुंदरीसारखी वाटते. सहस्त्राब्दीची ती वाट चालत आहे. १९५० साली ऑस्लोचा ९०० वा वाढदिवस नॉर्वेत अमाप उत्साहाने नॉर्वेकरांनी साजरा केला. नावे बदलणे हे स्त्रीजातीच्या कपाळी लिहिले असते, पण ते साधारण एकदाच होते. भांबुर्ड्याचे शिवाजीनगर आमच्यादेखत झाले तसेच काल्र्याचे मळवली! पण नॉर्वेतील या नंदननगरीचे सगळेच अलौकिक! १६२४ मध्ये ही नगरी अग्निमुखी पडली, पण डॅनीश राजा चौथा ख्रिश्चन याने ती पुन्हा बांधली. त्याच्या स्मृतीप्रीत्यर्थ कृतज्ञतेने ऑस्लोला ख्रिश्ची-यानीया असे नामाभिधान मिळाले व सुमारे ३०० वर्षांनी १९२४-मध्ये ऑस्लो या तिच्या माहेरच्या नांवाने ती जगात पुन्हा वावरू लागली, एखाद्या घटस्फोटीतेप्रमाणे.

या आगळ्या इतिहासाप्रमाणेच ऑस्लोचा भूगोलही वैशिष्ट्य-पूर्ण आहे. कदाचित जगातील सर्वात अधिक क्षेत्रविस्तार असलेली अशी ती नगरी आहे. १९४८ साली कायद्याच्या फटकाऱ्याने ऑस्लोची नगरमर्यादा मूळच्या सत्तावीस पट म्हणजे १७५ चौरस मैल करण्यात आली. पण गंमत म्हणजे यापैकी खरे वसलेले शहर सुमारे ३६ चौरस मैलच आहे. बाकी शेते व जंगले. बृहन्मुंबईचा नगर विस्तार करून ठाणे कल्याण–पनवेलपर्यंत न्यायला ऑस्लोचे उदाहरण अनुकरणीय आहे. एवढा प्रचंड विस्तार पण सर्व देशातील ३५ लाख वस्तीपैकी फक्त ४॥ लाख लोकच या प्रचंड शहरात राहतात. यामुळे घरटंचाईचा प्रश्नच उद्भवत नाही.

## इंग्लंडवरील स्वारीच्या आठवणी

इतकी माहिती डोक्यात पोचेपर्यंत सिटी हॉलपासून सुटलेली आमची नगरदर्शनी शहराच्या दक्षिणेस असलेल्या बिगदाई या हिरव्यागार द्वीपकल्पवजा सिलोनसारख्या दिसणाऱ्या भागात येऊन पोचली. बागदोईत प्रमुख म्युझियम्स आहेत. नॉर्वेकर लोकांनी ऐति-हासिक कामगिरी केली आहे आणि त्यांना आपल्या पूर्वजांच्या काम-गिरीबद्दल फार अभिमान आहे. नाटचमन्वंतराने सादर केलेल्या तक्षशीला नाटकात नॉर्वेजियन नाटककार जॉनसन याने व्हायकिंग लोकांचे दर्यावर्दी अफाट साहसी जीवन चित्रित केले आहे. ९ व्या व १० वा शतकात हे व्हायकिंग दर्यासारंग फार प्रसिद्ध होते. दर दसऱ्याला निजामावर स्वारी करायला शनिवारवाड्याच्या भव्य पटांगणात जसे पेशवे व त्यांची सेना जमा होऊन उत्साहाने सीमो-ल्लंघनास निघे, तसेच दर ग्रीष्म ऋतूत व्हायकिंग लोकांची गलबते सागरावर मुलूखगिरी करण्याकरिता निघत व इंग्लंडवर स्वारी करून त्याला जेरीस आणून जिंकीत असत ! या दर्यासारंग व्हाय-किंग युगाचे अवशेष म्हणजे ३ जहाजे येथील व्हायकिंग म्युझियम-मध्ये ठेवली आहेत.

नगरदर्शनीतून झरझर उतरून म्युझियममध्ये गेलो. एका लांब भव्य हॉलमध्ये तीन व्हायकींग जहाजे ठेवली आहेत. ही ऑस्लो फीओर्डच्या तळाशी सापडली. ही जहाजे सुदीर्घ पण अरुंद आहेत. त्यांची मान मोरासारखी डौलदार व स्वाभिमानी वाटते. सौंदर्य व पराक्रम यांचा मिलाफ येथे दिसून येतो. प्रसिद्ध ऑसबर्ग जहाज अत्यंत हलके फुलके बांधलेले आहे. हे कुण्या आशाराणीचे जहाज होते. तिच्या अखेरच्या प्रवासाची सर्व साधनसामुग्री त्यात होती. हे सर्व व्यवस्थित जतन करून ठेवले आहे. ओक झाडाच्या लाकडापासून तयार केलेले हे जहाज ७० फूट लांब आहे. या जहाजावर एक उच्च-कुलीन स्त्री व तिची दासी यांचे अवशेष सापडले. त्या जहाजातील सामुग्री दुसऱ्या दालनात जपून ठेवली आहे. उत्तर युरोपात सापड-लेल्या सर्व पुराणवस्तूत या जहाजाचे महत्व अधिक मानले जाते प्राचीन युरोपच्या इतिहासाचे हे एक ज्वलंत सोनेरी पान आहे.

## जगातील जहाजांचा चित्रमय इतिहास

दुसरे व्हायकींग जहाज गोकस्ताह फारच स्मार्ट व सुन्दर आहे. नौका बांधण्याच्या शास्त्रात नॉर्वेकर लोक इतिहासकाळीही फार तरबेज होते. एका नॉर्वेजियनने लिहिलेला जगातील जहाजांचा मोठा चित्रमय इतिहास मला येथे पहाण्यास मिळाला. प्राचीन भारतातील आर्यांचे सुमेरीया, बॅबीलोनीयनशी व्यापारी दळणवळण दर्यामार्गे होते. ऋग्वेदातही नौका आहेत. इ. सनाचे सातव्या शतकात चालुक्य राजा दुसरा पुलकेशी याने नौकांद्वारे परदेशांशी व्यापार केला. चोल राजा राजेंद्राने नौकांनी प्रवास करून मलाया, ब्रह्मदेश हे देश काबीज केले होते.

गोकस्ताह जहाज अत्यंत वेगवान होते व दर्यावर त्याने प्रभुत्व गाजवले.

एका दालनांतील कपाटात व्हायकींग गृहिणींची स्वयंपाक-साधने व हातमाग ठेवलेला आढळला. या ऐतिहासिक दिवास्वप्नातून मला वसवाल्याने जागे केले. वसवाले एकंदरीत जगाच्या पाठीवर सगळे सारखेच. कुणालाही स्वास्थ्य लाभून देणार नाहीत. मग तो ऑस्लोचा असो वा इस्लामपूरचा !

इतिहासकालातून आम्हाला आमच्या मार्गदर्शकाने लोकसंग्रहा-लयात नेले. जार्नसनने चित्रित केलेल्या व्हायकींग सागामधून आम्ही इब्सेनची अभ्यासिका जिथे भक्तिभावाने जपून ठेवलीय अशा लोक-म्युझियममध्ये येऊन पोचलो. हे एक खुले म्युझियम आहे. त्याची



अनुक्रमणिका






कल्पनाही लोकविलक्षण आहे. हे नॉर्वेतील कृषिगृहांचे संग्रहालय आहे. या स्वैर उद्यानात मध्ययुगापासून आधुनिक कालापर्यंतची १५० लाकडी घरे कालानुक्रमे ठेवलेली आहेत. ही घरे त्यांच्या मूळ वसतीस्थानापासून सोडवून काढून येथे आणून त्यांचे पुनर्वसन केले. ही सर्व थारेपालटाची कामगिरी नॉर्वेच्या सांस्कृतिक इतिहास तज्ज्ञाच्या देखरेखीखाली करण्यात आली. गडकऱ्यांनी कृष्णाकाठी नसलेल्या कुंडल गावाला कृष्णातटनिवासी वनवले व चांगल्या भूगोल पंडीताना पण फक्त काव्यातच ! येथे मात्र हा घरांचा थारेपालट प्रत्यक्षात घडलेला आहे.

### घरे बांधण्यातील उत्क्रांती

ही घरे नॉर्वेकर शेतकऱ्याच्या गृहनिर्मितीत झालेली उत्क्रांती दाखवतात. काही घरांचे दरवाजे अत्यंत ठेंगणे की, ठेंगूनट-मुकरी याची वाकून जावे लागेल व त्यांच्या ताठर मानेचा नक्षा उतरेल. उत्तरेची थंडी व वर्फ अगदी जीवघेणी म्हणून कॉटवरच झोपले पाहिजे. १६ व्या शतकातील एका लाकडी घरात एक छोटा पलंग पाहिला त्यावर चार लोक पलंगाच्या मध्यभागी पाय ठेवून झोपत. सदर्न-मराठाच्या पुणे कोल्हापूर रात्री प्रवासाची आठवण आली. काय दाटीवाटी ! या चोरट्या अंगाच्या खोलीत मुलींची वधू परीक्षा होई. कन्या-वस्तूला कॉटवर बसवीत. वरेच तरुण अर्जुन स्वयंवरा-साठी जमत. पण त्या शारदेचा धनलोभी कांचनभट पिता त्या वधू-कांक्षी तरुणांकडे फार जवरदस्त व्याज मागे. ते कुणालाही परवडत नसे. अखेर १०–१५ वर्षांनी तो वधूपिता अखेर लग्नाला परवानगी देई. पुरुषांपेक्षा स्त्रिया कमी संख्येने असल्या की त्या असा भाव खातात.

याच गृहसंग्रहालयात वाराव्या शतकातील गोल गुळगुळीत ओंडक्यानी वांधलेले एक गोल देऊळ आहे. त्याचे नाव गोल चर्च. भारत हा दगडांचा देश म्हणून येथील देव दगडांचे ! नॉर्वे हा जंगलांचा देश म्हणून येथील देवळे लाकडी. या घरातील स्वयंपाकाची उपकरणे व भोजनपात्रे वगैरे सर्व लाकडी आहेत. या सम्यग् दर्शनाने नॉर्वेच्या देहाती जीवनाची कल्पना आली. किती खडतर, कष्टमय व सुखशून्य ! याच लाकडी लंकेत अठराव्या शतकातील छोट्या खेडचाचे मीटस पुनर्वसन केले आहे.

या लोक लंकेत इब्सेनची अभ्यासिका पुर्ननिर्मित केली आहे. त्याचे टेवल, खुर्ची, पुस्तकांची कपाटे, लेखण्या, वगैरे येथे आहेत. या महान नाटककाराचे वाङमय-वर्कशॉप पाहून अंगावर शहारे आले. पॅरीसमध्ये नेपोलियनचा सेंट हेलीनातली छोटा मंचक व खोली पाहून जसे वाटले तशीच काहीशी भावना झाली. नेपोलियनने तलवारीने युरोप जिंकले पण ते साम्राज्य इतिहासजमा झाले. पण इब्सेनने आपल्या लेखणीने जिंकलेले युरोपियन मनावरील साम्राज्य अभंग आहे. त्याची मानसकन्या नोरा हिने नवऱ्याला घरात प्रवेश नाकारून धाडकन बंद केलेल्या दरवाजांचे पडसाद अजून युरोपातच नव्हे तर सर्व जगात दुमदुमत आहेत. वाङमयीन अस्मितेवद्दल प्रसिद्ध असलेल्या बर्नार्ड शॉवर देखील इब्सेनने मोहिनी घातली.

मध्ययुगात नॉर्वेकर व्हायकिंगच इंग्लंड जिंकीत असत असे नव्हे तर आधुनिक व्हायकिंग इब्सेन यानेही तो पराक्रम केला.

### भूत व वर्तमान यांचा मिलाफ

या वाङमयसूर्याकडून आम्ही कोनतिकी (सूर्यदेव) म्युझियम-मध्ये गेलो. आपल्याकडे घोरपडीच्या साहाय्याने तानाजी सिंहगडावर कसा चढला याचे प्रात्यक्षिक करून पहाणारे वीर अजूनही पाहायला सापडतात. तशातलाच हा प्रकार आहे. एअरदाल या इतिहासज्ञाने १९४६ मध्ये असे प्रतिपादन केले की प्राग्-इतिहासकालीन दक्षिण अमेरिकेतील साहसी दर्यावर्दी इंका लोकांनी लाकडी तराफ्यावर वसून पाच हजार मैलांचे अंतर कापून पोलीनीशियामध्ये वस्ती केली. आणि म्हणूनच दक्षिण अमेरिकेतील सांस्कृतिक अवशेष पोलीनीशियात सापडतात. याला प्रत्यक्ष संभाव्यतेचे प्रमाण म्हणून एअरदाल व त्याचे पाच सहप्रवासी यांनी इतिहासपूर्वकालीन लाकडी तराफा तयार करून पेरूतून निघून पॅसिफिक सागरातील वारा-वादळास जिद्दीने तोंड देऊन पाच हजार मैलांची सफर एकशेएक दिवसात आटोपली. या कोनतिकी म्युझियममध्ये एअरदालने वापर-लेली नौका व त्यावरील सर्व साधनसामुग्री ठेवलेली आहे. त्याची स्वयंपाकाची भांडी आहेत आणि तो काचेचा रॉकेली दिवा ! भूत आणि वर्तमान यांचा इतका पराक्रमी मिलाफ क्वचितच पाहायला मिळतो. शिवाय इतिहासाचार्यांची जिद्द व सत्यशोधनाची सक्रिय तळमळ ! महाराष्ट्रातही शिवाजी महाराजांच्या वाटेने आग्र्याला जाण्याचा प्रयत्न करणारी उत्साही मंडळी आहेतच.

बाकी हे नॉर्वेजियन लोक खरे धाडसी कर्तवगार आहेत. अगदी न 'शिवे भीति मना' या कोटीतले! जहाजांच्या साहाय्याने दशदिशांना स्वैरसंचार करणारे ! याच विगदाई भागात एका संग्रहालयात नानसेन याने १८९३ ते ९६ या काळात उत्तर ध्रुवावर स्वारी करण्या-साठी वापरलेली फ्राम ही साहसनौका आहे. काम मोठे प्रचंड आहे. ही नौका संग्रहालयाच्या दालनात कशी शिरली असे विचारताच आमच्या मार्गदर्शकाने सांगितले की आधी येथे हे जहाज आणले आणि मग समोवती शेड वांधली. मृच्छकटिकात मैत्रेय भटजीने वसंतसेनेच्या वाड्यात दिसणाऱ्या प्रशस्त प्रमदेला पाहून चारु-दत्ताला आपला अभिप्राय सांगितला की या बाईला आधी बसवून मगच तिच्या भोवती वाडा बांधला असावा ! हा काव्यातला अभिप्राय व्यवहारात खरा व्हायला नॉर्वेला यावे लागते ! होताच आमचा शूद्रक कवी दूरदर्शी ! हे जहाज कोलीन आर्चरने बांधले. याचे वैशिष्टच म्हणजे कठोर वर्फाच्छादित ध्रुवावर स्वारी करण्या-साठी बांधलेले लाकडी जहाज पण व्यवस्थित टिकले वरे ! वर्फाच्या थंडपणाला लाकडाने थंडपणे तोंड दिले.

'फ्राम'ला मोठी ऐतिहासिक प्रतिष्ठा प्राप्त झाली. कारण नंतर तेच जहाज अमेरिकेच्या उत्तरेचा शोध घेण्यास वापरले. आणि १९१०–१२ मध्ये ॲमंडसेनने दक्षिण ध्रुवावर स्वारी यावर बसूनच केली. आमच्यासारख्या प्रेक्षकांना मात्र यावर प्रत्यक्ष पदार्पण करून देत नाहीत. कदाचित् गुहकराजाप्रमाणे आमचे पाय नौकेला लागताच

तिचे काहीतरी मलतेच व्हायचे अशी नॉर्वे सरकारला भीती वाटत असावी.

फराम ही नौका पहाण्यासाठी चारीबाजूला गॅलऱ्या केल्या आहेत. त्यावरून आम्ही ती न्याहाळली. या लाकडी जहाजावर बसून ८७° उत्तरेस जाणे ही नानसेनची चित्तरकथा ऐकून प्रत्यक्ष ध्रुवावर न जाताच आम्ही गारठून गेलो.

पुन्हा नगरदर्शनीने प्रवास सुरू केला व सिटी हॉलपाशी परत आलो. १९४० साली मजूरपक्षाने ह्याच्या उद्घाटनास नॉर्वेकर राजेसाहेबांना बोलावले नव्हते. पण ते स्वतः आले व त्यांनी जनतेला चार शब्द सांगितले त्यामुळे त्यांच्याबद्दल आदर द्विगुणित झाला.

सहाला सेव्हॉय हॉटेलवर परतलो तो थोडक्याच वेळात ठरल्याप्रमाणे न्यायमूर्ती ब्रूवॉल तेथे आले त्यामुळे त्यांच्याबद्दलचा आदर द्विगुणित झाला. त्यांनी मला ऑस्लोचे आणखी भाग दाखवले. दक्षिण ऑस्लोत फरॉगनर पार्कमध्ये आम्ही आलो. सूर्य अस्तावत होता. विश्वामित्राने तपस्येने जशी प्रतिसृष्टी निर्मिली त्याप्रमाणेच गस्ताव व्हीजेलॅण्ड या समर्थ शिल्पसम्राटाने मनुष्यसृष्टी व जीवसृष्टी दगडात व धातूत कोरली आहे. या उद्यानात तीस वर्षे खपत होता तो.

अब्राहम लिंकनचा पुतळा इथे उभा आहे. हा अमेरिकन लोकांनी नॉर्वेकरांना नजर केला.

## शिल्पसृष्टीतील यक्षनगरी

व्हीजेलॅंडची ही कलानगरी म्हणजे एक यक्षनगरी आहे. पंचाहत्तर एकरात दीडशे कलाकृती आहेत. यातील मुख्य कल्पना अशी की मानवी जीवन हा एक अखंड झगडा. जन्मापासून संघर्ष. एका छोट्या दोन तीन वर्षाच्या संतप्त बालकाचा पुतळा अतिशय मार्मिक आहे. त्याने उजवा पाय किंचित् उचलला आहे. रागाने उजव्या पायाची बोटे घट्ट आक्रसून घेतली आहेत. दोन्ही हात पहिलवानाचे कुस्तीच्या पवित्र्यात आणि बालमुठी क्रोधाने मिटलेल्या, आई लक्ष देत नाही. तेव्हा प्रथम संघर्ष मातेशीच हेच ते जीवनाचे महान संघर्ष तत्त्वज्ञान. हे बालशिल्प विलक्षण समर्थपणे उभे केले आहे, जीवंत, जातिवंत! बापाभोवती लगडलेली मुले, आईच्या सहवासाला भुकेली मुले. मित्र, पतिपत्नी, शेजारी, कामकरी अशी ही शिल्पसृष्टी आहे. ऑस्लो म्हणजे नंदनवन. बायबलातील कथेप्रमाणे गार्डन ऑफ ईडनमधेच प्रथम सृष्टी देवाने निर्माण केली. तशीच ही शिल्पसृष्टी व्हीजेलॅंडने या युरोपीय नंदनवनात उभारली आहे. हेच इतिहासाचे तर्कशास्त्र!

या उद्यानाच्या प्रवेशद्वाराला सर्पाकृती प्राण्यांच्या प्रतिकृती दाखवून सैतानाचीसुद्धा नंदनवनात उणीव न ठेवता व्हीजेलॅंडने पूर्णोपमा सत्यसृष्टीत उतरवली आहे.

उद्यानातील पुलाच्या दोन्ही बाजूस ब्राँझच्या ५६ शिल्पकलाकृती आहेत. त्यांत मानवी जीवनाच्या विविध छटा आहेत. गर्भावस्थेपासून तुरूतुरू धावणाऱ्या मुलांची उत्क्रांती फारच हृद्य आहे!

पण सगळ्यात मास्टरपीस म्हणजे उद्यानात सर्वोच्च चबुतऱ्यावर उभारलेला मानवी स्तंभ. हा अखंड शिलेत कोरलेला आहे. छप्पन फूट उंचीच्या या मानवी मनोऱ्यात १२१ माणसे अनुस्यूत आहेत. प्रत्येकजण दुसऱ्याला खाली ढकलून वर जाण्याचा कसून प्रयत्न करीत आहे, अगदी निर्दयपणे! शिल्पकलेचा कोहिनूरच हा!

मॅथ्यू ऑर्नॉल्डने म्हटले आहे 'कविता म्हणजे जीवनाची टीका!' मी म्हणेन कोणतीही समर्थ ललितकला ही जीवनावरील भाष्यासारखीच असते. जीवनाशी फटकून वागणारी कला आल्हाद-आनंद देईल, पण अंडरस्टँडिंग (Understanding) देणार नाही! जीवनातील अंतर्मुखता जीवन सापेक्ष कलेनेच प्राप्त होते. व्हीजेलॅंड हा जीवनाचा महाभाष्यकार महाकवि होय! स्वीडनचा मिल्स व नॉर्वेचा व्हीजीलॅंड दोघेही महाकवि, पण मिल्स हा कलावंत कल्पनापंखावर वावरणारा सौंदर्यवादी कलाकार, तर व्हीजीलॅंड हा जीवनाला अर्थ देणारा सृजनशील टीकाकार. कल्पनारम्य आदर्शवाद। मिल्स तर राकट वास्तववादी व्हीजीलॅंड—जीवनाचे सम्यग् ज्ञान होण्यासाठी दोघांच्याही कलाकृती पाहिल्या पाहिजेत.

व्हीजीलॅंडच्या कलाकृतीवर संचिप्रकाश रेंगाळत असताना ब्रूवाल साहेबांबरोबर टेलिव्हिजन टॉवरकडे प्रयाण केले. ऑस्लो नगरीबाहेर समुद्रसपाटीवर त्रिवान टेकडीवर या टेहळणी टॉवरवर लिफ्टने गेलो. ३८९ फूट उंच हा मनोरा काहीसा आपल्याकडील लाटण्याच्या आकाराचा आहे. प्रत्यक्ष पोळीशी गाठ पडणारा लाटण्याचा भाग विद्युततेजाने उजळून टाकला आहे. रात्री हे दृश्य अपूर्व दिसते. सबंध उत्तरयुरोपात इतकी उंच वास्तू नाही! आम्हाला लिफ्टने नवव्या मजल्यावर फक्त १९५ फुटावर नेले, पण तेथून नॉर्वेचा पूर्वभाग अफाट दिसतो. यात विशेष म्हणजे वर एक यांत्रिक वाचाळ आहे. हव्या त्या मापेच्या इंग्रजीच्या कप्प्यात एक क्रोनोर नाणे टाकले व लगेच माहितीपूर्ण मनोरंजक टीकेची आकाशवाणी या बोलक्यातून कानावर पडली.

सायंकाळी शहराकडे परतताना वाटेत आम्हाला 'होमेन कोलेन' स्की (Ski) ची घसरपट्टी पहावयास मिळाली. १८४ फूट उंचीच्या घसरत्या मनोऱ्यावरुन स्कीच्या लाकडी फळ्या पायास बांधून वर्फाच्या पांढऱ्या पायघड्यांवरुन खाली घसरायचे. आणि असा चपल स्टार्ट घेऊन समोर लांब उडी मारायची. १९६८ साली विरकोला याने २९८ फूट उडी मारुन जागतिक विक्रम प्रस्थापित केला. हे अजब दृश्य पहायला हजारो लोक जमतात. पूर्वी नॉर्वेच्या राजघराण्यातील पुरुषदेखील या रेसमधे भाग घेत.

ब्रूवॉल साहेबांच्या बरोबर रात्री भोजन केले. सव्हॉय हॉटेलवर परत येताना ब्रूवॉलसाहेबांनी नाटयगृह दाखवले. त्यासमोरील जॉर्नसन व इब्सेन यांच्या भव्य पुतळ्यांचे दर्शन अविस्मरणीय आहे. न्यायमूर्तींनी मला हॉटेलवर सोडले. वाटेत त्यांच्याकडून कळले की नॉर्वेमध्ये न्यायाधीशांना फार मान आहे. डिस्ट्रिक्ट जज्जला सुमारे पांच हजार रुपये मासिक पगार आहे आणि दोनतृतीयांश निवृत्ती वेतन मिळते. शेवटी ब्रूवॉलसाहेबांचा निरोप घेतला, नाईलाजाने! नाहीतर कायद्याच्या गप्पा सुरू झाल्या असत्या तर उद्याचे कोपनहेगनचे विमान हुकले असते ना!

[क्रमशः]






# धन्य तेचि पुरुष



सुरेश गजेंद्रगडकर

ज्योतिषावर माझा कधीच विश्वास नव्हता. जी काही थोडी फार अंधुक शक्यता होती, तीही नानाच्या संगतीने नाहीशी झाली. नाना दीक्षित हा विलक्षण थापाड्या इसम, भविष्य सांगून पैसे मिळवीत असे. त्याने सांगितलेले होरे खरे ठरत हे विशेष! सुरुवातीस तो इतरांच्या घरी जाऊन सांगत असे. हळूहळू त्याने बाहेर जाणे बंद केले. लोकांनी घरी येणे सुरू केले. श्रीमंत माणसांची ये-जा सुरू झाली. घराला हळूहळू स्वरूप येऊ लागले. आम्ही दोघे एका ठिकाणी राहात असलो तरी त्याच्याकडे येणाऱ्या जनतेविषयी व त्याच्या धंद्याविषयी आम्ही विशेष चर्चा केली नव्हती. चार सहा महिन्यानंतर माझ्या लक्षात आले की येणारी माणसे वेगळी आहेत. दिसायला सभ्य व पैशाने श्रीमंत असली, तरी काहीतरी मानगड असावी असा मला संशय आला. मी वृत्तपत्रात काम करत होतो. मी माझी उत्सुकता एका मित्रासमोर सहज बोलून दाखविल्यावर त्याने जे सांगितले ते भयानक होते. मी ताडकन् घरी आलो. नाना एकटाच होता, मी सुरुवात केली,

"नानाजी!"

"बोल बेटा!" नेहमीची पद्धत. मला बेटा म्हटलेले आवडत नसे!

"आपल्याकडे येणारे भगत वेगळे दिसताहेत" एक निरर्थक वाक्य.

"होय!" बाण वाया गेला होता.

"कोण आहेत? ही नवी गिऱ्हाईकं बदमाष वाटतात."

"बरोबर आहे बेटा तुझे. तुलाही माझ्या संगतीनं भूत कळो लागले!"

"तू भूत आहेस—नान्या! नीट बोल! या बदमाषांना तू जवळ कां केलंस? लेका हड्डी नरम करतील चुकलास तर!" माझा संताप बोलला.

"बेटा विजू, तू जसा वयाने वाढलास तसा तुझा मठ्ठपणाही वाढत गेलेला दिसतोय्" शांतीसागरावरला फेस.

"अरे पण नीट सर्व सांगतोस का..." हातातील क्रिकेटचा स्टंप उगारत माझा संताप कृतिवान होऊ पहात होता.

"बरं! सांगतो. ठेव ते लाकूड बाजूला" क्रिकेटच्या जन्मजात शत्रूचे हे बोलणे इतर वेळी ऐकून घेतले नसते, परंतु माझी उत्सुकता ताणली गेली होती, तेव्हा मी स्टंप बाजूला ठेवून ऐकू लागलो.

"हे युग स्पेशॅलिस्टांचे आहे बाबा! आमच्या भविष्य सांगणाऱ्यांमध्ये देखील कुणी राजकीय भविष्याचे स्पेशॅलिस्ट तर कुणी लग्नमुंजीचे स्पेशॅलिस्ट, कुणी नोकरीचे स्पेशॅलिस्ट तर कुणी छोकरीचे! तेव्हा मी आपला एकदम वेगळा स्पेशॅलिस्ट व्हायचे ठरवले!"

"कशाचा?"

"चोरांचा!

"काय चोरांचा?" मी पार च्या ऽ ऽ ट झालो होतो.

"होय!" शांतीचा हिमालय.

"म्हणजे हे जे सगळे महाजन इथं कधी स्वतःच्या वाहनांतूनही येतात ते चोर आहेत?"

"येस्. वाय् – ओ – एस्!" नान्याला इंग्रजीत स्पेलिंग सांगून शब्दात असलेल्या जोरापेक्षा अधिक जोर भासवायची वाईट खोड होती.

"त्यांना काय सांगतोस तू?" हताश मी.

"चोरी केलेली लाभेल की नाही व चोरी कधी किती वाजता करावी हे!" तितक्याच थंडपणे नाना.

"नान्या, लेका तुला काही..." पुढले शब्द म्हणायच्या आधीच त्याचा उपयोग नाही हे कळले.

"माझी पद्धत साधी सरळ आहे." माझ्या अर्धवट सोडलेल्या वाक्याचा काहीही परिणाम झाला नव्हता. "मी साध्या घरफोडीला चंद्रोदयापूर्वी एक प्रहर व तिजोरी फोडणे इत्यादि महा कार्यास बादली रात्र हे मुहूर्त सांगतो. काही पथ्य सांगतो. बहुतेक वेळा सरशी होते. चुकुन सापडलाच तरी तो स्वतःलाच दोषी मानतो."

"आनंद आहे!" मी अत्यंत कुत्सितपणे म्हणालो.

"खरं आहे!" एक गेंडा बनवून त्याच्या उरलेल्या मालात ह्याला देवाने बनवला होता!



अनुक्रमणिका

मी मात्र दुसरे दिवशी ते घर सोडले– व पुढे ते गांवही. ह्या गोष्टीला आठदहा वर्षे झाली. मी एक मोठी वृत्तपत्रसंस्था काढली होती. त्यात मासिके व दैनिके दोन्ही होती. मी कामात नेहमी व्यग्र असे. एके दिवशी सकाळी माझ्या ऑफिसात नाना आला. गेल्या दहा वर्षांत भेट झाली नव्हती भेटल्यावर आनंद झाला. (किती झाले तरी आम्ही जिगर दोस्त होतो.)

जरा इकडच्या तिकडच्या गोष्टी झाल्यावर मी त्याला चिडवले "काय नानबा काय म्हणताहे तुमचे ज्योतिष्यशास्त्र ?"

"मी तो धंदा सोडलाय्" गृहस्थाने शांतपणा सोडला नव्हता.

"कां ? वडवला वाटतं धरून ! – तुम्ही तसेच! तरी मी सांगत होतो. "

"नाही, तसं काही झाले नाही." पुन्हा शांत स्वर.

" मग ? " अस्मादिकांची उत्सुकता.

"एकदा असाच एक गृहस्थ हात दाखवायला व मुहूर्त पाहायला आला. त्याच्या हातावर अंगठ्याच्या खाली एक लांब जखमेची खूण होती. मी चेहरा पुन्हा पाहिला आणि चमकलो."

"कां ! ओळखीचा होता काय ?"

"होय, लहानपणापासून. ती जखम झाली तेव्हा हजर होतो."

"कसा ?"

"माझे वडील व माझी आई यांचं कधीच पटलं नाही. मी चार वर्षांचा होतो, तेव्हा ते एकदा नेहमीप्रमाणे खूप पिऊन आले आणि आईला मारायला लागले. मी जागा झालो. मी आईकडे गेलो, परंतु त्यांनी मलाही एक सटका दिला. आईनं आजपर्यंत सहन केलं होतं, परंतु मला मारलेलं सहन झालं नाही. तिनं त्यांना जोरानं ढकललं. ते दूर जाऊन पडले. पडतांना टेबलावर उघडी ठेवलेली विळी हातात घुसली आई ओरडली. तिनंच ती जखम बांधली. परंतु दुसऱ्या दिवशी आम्ही दोघांनी ते गांव सोडलं. माझ्या आईच्या व माझ्या आयुष्याचं नुकसान ह्यानंच केलं होतं !"

**"म्हणजे तू वडलांची सूड घ्यायची संधी घेतलीस म्हण की."**

"होय. मी पौर्णिमेच्या दिवशीचा त्यांना मुहूर्त दिला व ह्या गांवी निघून आलो.'

काही काळ मी स्तब्ध बसलो.

"विश्वास नाही वाटत ?" तो.

"कथा मोठी सुरेख आहे. विश्वास वाटावा इतकी !"

"खरं आहे! ती कथाच आहे. ही सारी थाप आहे ! आणि तू मला नोकरी द्यावीस ह्या हेतूनेच मी ती तुला बनवून सांगितली ! " संथ कबूली.

"माफ करा नानाजी, आमच्या मासिकांत किंवा वर्तमानपत्रात आम्ही भविष्य देत नाही" कुठेतरी मी सुचावत. आवाजाला किंचित् धार देत म्हटले.

"बेटा विजू, मला ती नोकरी नकोय्."

"मग ? " पुनः मीच अधीर

तुझ्या एखाद्या नियतकालिकात 'असत्य कथा' लिहिण्याची नोकरी हवी आहे. आणि माझं कथा गोवण्यातील कौशल्य तू पाहिलं आहेसच !"

मी त्याच्याकडे पाहत राहिलो.

. . .हल्ली तो माझ्या प्रत्येक नियतकालिकातून लिहित असतो. आणि खरोखर लोकांना ते आवडतं ! (आधारित).
















# फडणीसांची हंसरी गॅलरी

'हास्य-मुखपृष्ठांचे स्पेशॅलिस्ट' म्हणून ज्यांचा सार्थ व साभिमान गौरव करता येऊ शकेल अशा, पुण्याच्या, चित्रकार शि. द. फडणीसांच्या "हसऱ्या गॅलरी"चा तळ सांप्रत मुंबापुरीत पडला असोन ह्या मजकूर लिहीत असताना तो दादर प्रांती आहे. मुंबईत तशा 'आर्ट गॅलऱ्या' पुष्कळ असल्या व त्यात सध्या 'आर्ट' प्रदर्शनांची धमाल चालू असली तरी त्यात 'हसरी गॅलरी' एकही नाही. ती आहे फक्त फडणीसांची आणि डोंबिवलीत पंधरा दिवस ती मुक्काम ठोकन होती. तिथेही तिला शाळा मिळाली. दादरलाही बालमोहन शाळाच मिळाली आहे. पण फडणीसांच्या आर्ट स्टुडिओपासून (सुभाषनगर, पुणे) ते डोंबिवली-दादर-गिरगावपर्यंत त्यांच्या हास्यचित्रांनी आधीच स्वतःचा असा एक प्रेक्षक वर्ग निर्माण करून ठेवला आहे. 'फडणीस' हे आता ह्या क्षेत्रात नुसते आडनाव राहिलेले नाही. तर ते एक "विशेष"नाम झाले आहे. आणि महाराष्ट्राला हसायला शिकविणाऱ्या महाभागात आता फडणीसांचे नावही जमारुजू झाले आहे. फडणीसांच्या ह्या यशात 'हंस' मासिकांचे कल्पक, साक्षेपी व प्रयोगशील संपादक कै. अनंत अंतरकर यांचा वाटा फार मोठा आहे हे तेही जाणतात–मानतात व महाराष्ट्रालाही ते ठाऊक आहे.' हास्यचित्रांची आकर्षक व आगळी मुखपृष्ठे देण्याचा साक्षेपी प्रयत्न अंतरकर यांनी केला. आणि तो अल्पकाळात लोकप्रियही झाला. त्याचे श्रेय फडणीसांची कल्पकता, रेखाटनातील लय, मार्मिकता व सुरेख रंगसंगती यानाच द्यावे लागेल. आता हे मुखपृष्ठांचे मोहक, हसरं स्वप्नमय जग मूळ रंगरूपात रसिकांच्या समोर 'हसरी गॅलरी' ह्या प्रदर्शनाच्या रूपाने आलेले आहे. यापूर्वीही एकदा ते मुंबईकरांच्या भेटीला येऊन गेले आहे. पण गॅलरीत नवी व आकर्षक भर बरीच पडली आहे हे मुद्दाम नमूद करतो.

## गॅलरीतलं जग

सुंदर, आल्हादक, मृदु, टवटवीत असे ते जग आहे. याचे प्रमुख कारण मला वाटते त्यातल्या शुद्ध विनोद व कलात्मक वृद्धीत आहे. ह्या जगात वैर नाही, द्वेष, मत्सर नाही. लौकिक जीवनाशी सर्वस्वी नाते सांगणारे, लौकिकाचीच आभूषणे ल्यालेले आणि तरीही ह्या एका अर्थाने अलौकिक असे हे जग आहे. आणि म्हणूनच 'हसरी गॅलरी' पाहताना 'कुत्सित' हासू फुटत नाही. माणसे दिलखुलास हसतात. आरशातले आपलेच थोडेफार कुरुप वा विघडलेले रूप पाहून निर्व्याजतनें हसायला मनाची एक 'सम' बैठक साधावी लागते. फडणीसांची हास्यचित्रे पाहताना ही सम बैठक सहजच साधून जाते हे त्यांचे पहिले वैशिष्टच ! ह्या जगातली ही सारी माणसं अशी निर्व्याज, निरागस हसणारी व हसायला लावणारी आहेत.

## बोलकी चित्रे

ह्या चित्रांचे दुसरे वैशिष्टच म्हणजे त्यांना 'खुलासे', 'बॅनर्स' लागत नाहीत. ती स्वतःच प्रेक्षकांशी सहज बोलतात. स्वतःच्या हालचाली, भावदर्शन, डौल यातून सारे काही स्पष्ट होत जाते. मुख्यतः यातली बहुसंख्य चित्रे ही मासिकाच्या मुखपृष्ठांच्या माध्यमातूनच जनतेपुढे आलेली असल्याने त्यांना हे रूप अपरिहार्यपणे घ्यावे लागले वा आले असण्याची शक्यता आहे; पण जी चित्रे अशी मुखपृष्ठावर आलेली नाहीत त्यातही फडणीसांच्या कल्पनेचे व कुंचल्यांचे हे कसब दिसून येते. आणि इथे चित्रकार–कल्पक हास्यचित्रांचे स्पेशॅलिस्टः म्हणून फडणीसांचे मोठेपण ध्यानी येते.





अनुक्रमणिका

## तिसरे वैशिष्ट्य

ह्या चित्रांचे जग एका अर्थाने सीमित आहे. बहुशः ते पांढरपेशांचे जग आहे. त्यात माळी, सुतार, फोटोग्राफर, न्हावी, बोहारीण, डॉक्टर, दुकानदार, दूधवाला भैय्या, समाजसेविका आदि विविध पेशातली माणसे दिसत असली तरीही त्यांचा परिसर हा मुख्यतः पाढरपेशांचा आहे. परंतु ह्या सीमित जगातही फडणीसांनी जे जीवनदर्शन घडविले आहे ते मात्र सीमित नाही. मर्यादित नाही. प्रत्येक चित्रातली कल्पना वेगळी आहे. हास्यविषय आगळा आहे. 'एंफसिस' वेगळा आहे. डील वेगळा आहे. विनोदासाठी उपहास, उपरोध, अतिरंजनादि अनेक गोष्टी लागतात. वास्तवाच्या फूटपट्टचा व तर्कबुद्धी घेऊन जाणाऱ्यांना ह्या हास्यचित्रातला निरागसपणा, अतिरंजन हसवू शकणार नाही. काही नाटके, काही चित्रपट आपण केवळ 'चार घटका करमणूक' ह्या वृत्तीने पाहतो. फडणीसांची 'हसरी गॅलरी' "हसण्यासाठीच पहा" असे सांगण्याची खरी गरज नाही. पण चौकोनी चेहरेवाल्यांसाठी व वास्तवाचा ढोल वेळीअवेळी घडविणाऱ्यांसाठी हे लिहिलं.

फडणीसांनी आपल्या क्षेत्रात आपले आगळेपण सिद्ध केले आहे. फडणीसांचे चित्र चटकन ओळखता येते हे 'स्पेशलायझेशन' त्यांनी संपादन केले आहे. आणि मला वाटते ही त्यांची चालू जमान्यातली मोठी कमाई आहे. कारण चालू जमाना आहे स्पेशलायझेशनचाच ! !

— **चित्रगुप्त**




( पृष्ठ ५ वरून—**आमचेही(एक) मत** )

### संगीत अंक आवडला

स. न. वि. वि.

'दीपावली'चा संगीत अंक – 'मे'चा– पोहोचला.

अंक जवळजवळ समग्र वाचला व आवडला हे सांगण्यास आनंद वाटतो. श्री. आनंद साधले, श्री. वेडेकर यांची आर्टिकल्स चांगलीच आहेत. तसेच श्री. सीताराम फातर्पेकर, प्रभा अत्रे आणि अभिषेकी यांच्या मुलाखती चांगल्या आहेत. गोष्टी अजून वाचावयाच्याच आहेत.

आपण दरवर्षी हा अंक काढता याबद्दल आपणांस मनापासून धन्यवाद देतो. संगीतविषयक वाङ्मयाचे दुर्भिक्ष्य लक्षात घेता आपण करीत असलेल्या प्रयत्नांचे मोल मोठे आहे.

कळावे.

मुंबई–१ आपला

६–५–७० **वामन द. देशपांडे**

### गालीप्रदान म्हणजे खंडन नव्हे !

स. न. वि. वि.

एप्रिलच्या अंकातील श्री. लवंदे यांचा बर्ट्रांड रसेलसंबंधीचा लेख वाचला. आम्हा भारतीयांची बुद्धी परप्रत्ययनेव कशी झाली आहे आणि आपल्या तत्त्वज्ञानाचा पूर्णतः अभ्यास न करता पूर्वग्रहदूषित मनाने मनःपूत लिखाणाने शहाणपणाचा टेंभा मिरविण्याचे उत्कृष्ट उदाहरण म्हणजे प्रस्तुत लेख होय. बुद्धिमत्ता आणि परतत्त्वाचा स्पर्श झालेली सिद्धप्रज्ञा यात महदंतर आहे हे लेखकाच्या ध्यानी नसावे. असे लोक म्हणजे भारतवर्षाला लांच्छनास्पद होत. परमतसहिष्णुता म्हणजे स्वकीय मतावर आधारहीन गरळ ओकणे नव्हे ! पाश्चात्यांचे तत्त्वज्ञान पुस्तकी आहे. याउलट भारतीय तत्त्वज्ञान म्हणजे जीवनात उतरविण्याचे तत्त्वज्ञान होय. वैदर्भीय संत गुलाबराव महाराज यांनी पाश्चात्य तत्त्वज्ञांबाबत म्हटले आहे की एखादा हत्ती चार आंधळ्यांपुढे उभा केला तर त्यापैकी प्रत्येकजण हत्तीचे वर्णन वेगवेगळे करतो, तसेच पाश्चात्य तत्त्वज्ञांचे आहे. याउलट भारतीय तत्त्वज्ञ आत्मतत्त्व करतलामलकवत् स्पष्ट पाहतात. भारतीय तत्त्वज्ञान निश्चित आहे, प्रयोगशील नाही. फक्त मार्ग स्वीकारला पाहिजे. ऋषींच्या ऋतंभरा प्रज्ञेतून प्रकटलेली उपनिषदे जाणण्यास गुरुमुखाने समजून आणि अनुभूतीसाठी बुद्धीचा आचरणपूर्वक यत्न लागतो. त्यामुळे एखाद्या मुक्कडाला न समजण्याने ती मुक्कड निश्चित होत नाहीत. असंताने संताला संत ठरविण्यासारखा दुसरा विनोद नाही. पूर्णप्रज्ञ फारशी बडबड करीत नाही. अर्धप्रज्ञ आणि मूर्ख अतोनात बडबड करतात. या लेखकास दुसऱ्या वर्गात बसविणे म्हणजेही सन्मान करण्यासारखे आहे. पुन्हा 'जंबूक करी गर्जन जोवरी देखिला नाही पंचानन'. अनुभूतीखेरीज तत्त्वज्ञानाच्या बाष्कळ बडबडीस भारतीय तत्त्वज्ञान असे म्हणतच नाहीत. प्रस्तुत लेखक म्हणजे 'त्वचेचिया





अनुक्रमणिका

पदराआडचे दूध' न सेविता 'रक्त सेविणारा' होय. सांख्यदर्शन, पंचदशी आणि सिद्धान्ततत्त्व विंदू यांचा सूक्ष्म अभ्यास लेखकाने केल्यास असले निरर्गल प्रलाप करण्याचा मोह होणार नाही. वादाचीच खुमखुमी असेल तर ब्रह्मश्री करपात्री स्वामी, राजेश्वरशास्त्री द्रवीड किंवा कोणत्याही पीठस्थ जगद्गुरुपुढे जाहीर पूर्वपक्ष-उत्तरपक्ष करावा. असो! कालप्रवाहात असले क्षुद्र लेखक व त्यांची कुविचारयुक्त चोपडी नष्ट होतात, पण वेद-शास्त्रे-पुराणे चिरंजीव आहेत. या लेखकाचे मोजमाप म्हणजे'—

अविद्यायां अंतरे वर्तमानः
स्वयं धीराः पण्डितमन्यमानाः ।
जङ्घन्यमानाः परियंति मूढाः
अन्धेनैव नीयमाना यथान्धाः ॥

याखेरीज वेगळे नाही.

संपादक महोदयांनीही असला लेख आंधळेपणाने केवळ डीग्रीच्या शेपटाकडे पाहून छापावा याचेही सखेदाश्चर्य वाटते. शेवटी एकच लक्षात ठेवावे की ——

आहारनिद्राभय मैथुनं च,
सामान्यमेतत्पशुभिर्नराणां ।
धर्मोऽहि तेषामधिको नराणां,
धर्मेण हीनाः पशुभिः समानाः ॥
स्वधर्मे निधनं श्रेयः
परधर्मो भयावहाः । (भ. गी.)
तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते
कार्याकार्य व्यवस्थितौ
ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म
कर्तुमिहार्हसि ॥

एरण्वन ग्रामस्थळ, आपला
पुणे–४ **श्री. ज. मोडक**

[केवळ गालीप्रदान करण्याने आपणास नको असलेल्या विधानांचे खंडन होत नाही. गालीप्रदान करण्याऐवजी डॉ. लवंदे यांच्या लेखाला समर्पक उत्तर कुणी पाठविले असते तर ते छापण्यात आम्हाला अधिक आनंद वाटला असता—**संपादक**]

## तत्त्वज्ञान म्हणजे काय ?

स. न. वि. वि.

आपल्या एप्रिल ७० च्या 'दीपावली'त प्रकाशित झालेला डॉ. प्रा. ग. ना. लवंदे-लिखित 'बर्ट्रॉण्ड रसेल' हा लेख म्हणजे विश्वविख्यात ब्रिटिश तत्त्वज्ञ श्री. रसेल यांच्या असामान्य बुद्धिवैभवाची व अनन्यसाधारण तात्विक भूमिकेची महती पटवून सांगणारा खरोखरच प्रशंसनीय प्रयत्न आहे. डॉ. प्रा. लवंदेसाहेबांना आमची अशी विनंती आहे की त्यांनी रसेलसाहेबांच्या तत्त्वज्ञानावर असेच सुगम लेख लिहून अधिकाधिक प्रकाश टाकावा.

पौर्वात्य आणि पाश्चिमात्य तत्त्वज्ञानाचा एक तुलनात्मक अभ्यासक या नात्याने मला डॉक्टरसाहेबांना त्यांच्याच लेखातून उद्भवलेले काही प्रश्न विचारावयाचे आहेत. त्यापूर्वी त्यांना हे सांगून टाकावेसे वाटते की मी भारतीय तत्त्वज्ञानाच्या सांप्रदायिक परंपरेत पोसला गेलेला आणि तत्त्वज्ञानाचा आव आणणारा बोकेसंन्यासी नाही, किंवा एखादा भट-भिक्षुक अथवा ब्राह्मणत्वाची घमेंड मिरविणारा बुवाही नाही. मी तत्त्वज्ञानाचा एक अगदीच सामान्य विद्यार्थी आहे. आमचे डॉ. राधाकृष्णन, रानडे, इतकेच नव्हे तर लो. टिळकांसारखे गीताभाष्यकारदेखील बर्ट्रॉण्ड रसेलच्या तात्त्विक विवेचनाच्या तुलनेत, डॉ. साहेबांच्या शब्दात म्हणावयाचे झाल्यास, 'मुक्कड-बोगस' वाटतात, या त्यांच्या विधानाशीही मी काही अंशी सहमत आहे; परंतु 'गीतेत काय तत्त्वज्ञान आहे ? उपनिषदात काय तत्त्वज्ञान आहे ?' अशा प्रकारचे बालिश प्रश्न उपस्थित करताना डॉ. साहेबांनी भारतीय तत्त्वज्ञानाचा अगदी विशुद्ध दृष्टिकोनातून किती सखोल अभ्यास केला आहे हे कोणत्याही सूज्ञ वाचकाच्या लक्षात आल्याखेरीज राहणार नाही ; पण आमच्या डॉ. साहेबांना बुवाबाजीच्या ढिगाऱ्याखाली दडलेले भारतीय तत्त्वज्ञानाचे प्रत्यक्ष यथार्थ दर्शन घडण्याचा कधी योगच आला नाही त्याला ते तरी काय करणार ? परंतु भारतीय तत्त्वज्ञानावर आणि भगवद्गीतेसारख्या विश्वमान्य सार्वभौम ग्रंथावर लत्ताप्रहार करून त्यांनी तो योग जवळ आणला आहे, असे मला वाटते. थोरांची निंदा केल्यानेदेखील कल्याणच होते असे म्हणतात. ते काही खोटे नाही. आदरणीय डॉक्टरसाहेबांनी खालील प्रश्नांची उत्तरे शक्यतोवर जाहीररीतीने देण्याची कृपा करावी :—

(१) तत्त्वज्ञान म्हणजे काय ? व त्याचा मानवी जीवनाशी काय संबंध आहे ?
(२) तत्त्वज्ञानाला जन्म देणारा मूलभूत प्रश्न कोणता ? हा प्रश्न बर्ट्रॉण्ड रसेल आणि पाश्चात्य तत्त्वज्ञान्यांनी कसा समाधानकारक सोडविला आहे ?
(३) गीतेतील, 'अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्त्वज्ञानार्थ दर्शनम् । एतज्ज्ञानमिति प्रोक्तमज्ञानं यदतोन्यथा ॥' किंवा 'ज्ञानंविज्ञानसहितं यज्ज्ञात्वा मोक्षते शुभात्' इत्यादि विधानांचा तात्त्विक अर्थ काय आहे ?
(४) गीतेत तत्त्वज्ञान नाही. गीता आणि उपनिषदे म्हणजे केवळ मठा–भिक्षुकांची, बुवाबाजीची पर्वणी आहे हे तुमचे म्हणणे साधार, राष्ट्रीयदृष्टचा सिद्ध करा.
(५) आपणांस भारतीय अध्यात्मविद्येचा प्रत्यक्ष अनुभव आहे काय?

मंगळवार पेठ आपला
पुणे–११ **एस. बी. चांदेकर**

## फिल्म्स डिव्हीजनचे अधिकारी

स. न. वि. वि.

दीपावलीच्या एप्रिल अंकात "फिल्म्स-डिव्हिजन–एक रसग्रहण" हा माझा लेख आपण छापला आहे. या लेखावरोवर असलेल्या श्री. प्रमोद पती यांच्या छायाचित्राखाली त्यांच्या हुद्दयाबद्दल छपाईची चूक झालेली दिसते. श्री. प्रमोद पती उपमुख्य निर्माता असून, श्री. मोहन वधवानी हे मुख्य निर्माते आहेत.

मुंबई–१६ आपला
१४–४–७० **पुरुषोत्तम बावकर**







अनुक्रमणिका

# भारतात पहिल्यानेच!
# नव्या भिंतींसाठी नवा पेण्ट —
# डेकोप्लास्ट

नव्या प्लॅस्टरवरही प्रायमरशिवाय लावता येतो.
उन्हापावसात वर्षानुवर्षे टिकून राहतो.




**सिमेंट पेण्टशी तुलना केल्यास:**

- ☐ मजुरीचा खर्च ४०% कमी!
- ☐ रंगकामाच्या ७ क्रियांऐवजी दोनच पुरेत!
- ☐ पाचपट जास्त भाग रंगविता येतो!

डेकोप्लास्ट बेस व्हाइटमध्ये मॅजिकटच मिसळून ४० मनपसंत रंगछटा झटपट तयार करता येतात. शिवाय ५ पक्के, गर्द रंग तयारच मिळतात.

**जीवनातील रंगसंगती म्हणजेच एशियन पेण्टस्**

AIYARS-A-70 MAR.








(पान १० वरून–मणेरकर)

आधीभूत आधी दैवाला। आधी यज्ञ नच समजत मजला। कोण वसवि या देह गृहाला। अंति आत्म संयमी स्मरणाला। केवि करित तुमचे ॥

**मूळ श्लोक : अक्षरंब्रह्म परमं ( मृच्छकटिक–सार्थचि ते वदती लोकी तोडी–त्रिताल )**

ब्रह्मच त्या म्हणती पार्था, अक्षर अविनाशी त्याची गती ॥ धृ ॥

**(विद्याहरण – अहंकार माझा विदेही – सिंधुरा-झपताल)**

**कवि पुराणमनुशासितारम्**

जगाधारशास्ता अनादी जयाला। अणुहुनी सूक्ष्मा गति त्या ईशाला ॥ धृ ॥ मन वृद्धि जेथे। मती मूढ होते ॥ सर्वज्ञ ॥ तमशून्य कांती ज्याला ॥ १ ॥

**( शारदा– जो लोक कल्याण – मालकंस. झपताल)**

**यदक्षरं वेदविदो वदन्ति**

अविनाशि नामास। वेदज्ञ दे ज्यास। निष्कामि यति यास। जें मोक्ष देते ॥ धृ ॥

**अध्याय १२ वा**

**एवं सतत युक्ता ये –**

**(श्रेयं ध्येय राजा–"आकळे न अघटित" पहाडी–त्रिवट कवाली)**

सर्व काळ तुमच्या भजना। करुनी स्थिर मना ॥ धृ ॥ भक्त ते तुम्हा आळविती। की सदैव निर्गुणि भजती अव्ययात अक्षरि रमती। श्रेष्ठ यात कोणती भक्ति.

**क्लेशो ऽधिकतरस्तेषाम्**

**(मृच्छकटिक-रजनिनाथ हा नभी उगवला. दरबारी कानडा).**

अव्यक्ती नर मना जडविता। होति थोर सायास तच्चिता ॥ धृ ॥

मय्येव मन आधत्स्व मयि वुद्धि निवेशय।

**[ मानापमान–वरि गरिबा वीराजी–झिंझोटी ]**

मम भजनी लावी तू स्वमना। तशि वुद्धि वेची मद्ध्याना। मिळनिशी निःसंशय मद्स्थाना। होशिल लीन तू ममस्वरूपी....

ही झलक म्हणून सादर केली आहे. तसे हे भांडार विपुल आहे. अठरा अध्यायांच्या शेवटी मोह-भ्रम नाहीसे झालेला अर्जुन युद्धास तयार झाला आहे तो म्हणतो "नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा –"

मणेरकर म्हणतात,

(सौभद्र–चाल–वाटे सर्वथा मुक्त–भूप)

प्रभो अच्युता भ्रांति गेली ॥ धृ ॥ वोध मज कथियला मोहमल नष्टला। त्या प्रसादे मला शुद्धि आली ॥ सांगशी जी कृती। करिन मी निश्चिती। युद्ध कर्मा धृती। सिद्ध झाली ॥

"इत्यहं वासुदेवस्य पार्थस्य च महात्मनः"

ह्या व नंतरच्या काही श्लोकांना पद्यरूप देताना मणेरकर यांनी कुशलतेने "हे श्रीकृष्णा, अज्ञ सी. ग. मणेरकर (त्यांची कविता 'अज्ञ' ह्या नावानेच प्रसिद्ध झालेली आहे) यास मुक्ति दे" अशी प्रार्थना केली आहे.

ह्या सारा 'गीता-प्रपंच' मी साक्षेपाने वाचला. काव्याच्या वा गीतांच्या ( गणमात्रा-वृत्तदोष ) कसोट्या कसोशीने लावल्या तर ह्यातली काही कविता वाद होईल हे मी जाणतो. परंतु फारसे शिक्षण न लाभलेल्या व काव्यशास्त्राची तोंडओळखही न झालेल्या ह्या माणसाने पन्नाशीच्या पुढे गेल्यावर हा प्रपंच सुरू केला आणि सतत पंचवीस वर्षे नाउमेद न होता, वैयक्तिक सुख, दुःखांचे कुठलेही ओरखडे अंगावर उमटू न देता उमेदीने हा पूर्ण केला ह्या गोष्टीलाच मी ग्रेस मार्क देतो आणि त्या श्रद्धेला, प्रयत्नशीलतेला, गीता-कथित कर्मयोगाच्या आविष्काराला मी अभिवादन करतो.

मणेरकर यांची काही स्फुट कविताही 'अज्ञ' ह्या नावाने प्रसिद्ध झाली आहे. १९३१ सालच्या '**व्यावहारिक विषमता**' ह्या कवितेतील ह्या ओळी आजही मजेशीर वाटतील.

जरि एक प्राण हरिला हत्यारी त्यास वदती
वहुसंख्य लोक वधिता रणि, वीर मानिताती.

## आणखी काही विशेष छंद

याशिवाय मणेरकर यांचे आणखीही काही छंद आहेत. त्यात जुन्या कागदपत्रांबरोबरच जुनी नाणी, जुनी पोस्टाची तिकिटे, आगपेटचांची लेवले, आदि गोष्टी जमविण्याचा छंद त्यांना आहे. ईस्ट इंडिया कंपनीच्या काळापासून आजतागायतची सारी भारतीय नाणी त्यांच्या दप्तरी आहेत. जगातील सर्व प्रमुख देशांचीही नाणी यथाक्रम-यथादेश लावलेली आहेत. **तीन हजारांच्यावर** काडेपेटचांची लेवले आहेत त्या लेवलांवर जवळजवळ सर्व प्रमुख संस्थानिक, निजाम, शिवाजी महाराज, संभाजी महाराज आणि अनेक महापुरुषांचे फोटो आहेत. ही सर्व लेवले रंगीत असून सुरेखपणे कलात्मक पद्धतीने छापलेली आहेत. नाण्यात व्हिक्टोरिया राणीच्या काळचेही नाणे आहे. इ. स. १५८०/९० सालची पोर्तुगीज नाणीही त्यांच्या संग्रही आहेत.

श्रीकृष्ण व शिवराय यांच्या जीवनातील साम्य सुचविणारे सत्ताधीश प्रसंग निवडून त्यावर मणेरकर यांनी एक काव्यरचना केली आहे. त्याचे नाव आहे "श्री शिवभूप पद्यमय चरित्र".

गीतावोधावरही त्यांनी काही स्वतंत्र गद्यलेखन केले आहे. त्यात 'गीतेतला स्वधर्म' व आजच्या हिंदु जनतेच्या आचरणातला 'स्वधर्म' एकच आहे काय ? गीता वोधाचा काल, गीता वोधकालीन संस्कृती, गीता-वोधाची कारणे, शंतनु ते भारतीय युद्धापर्यंतचा इतिहास, कौरव-पांडव यांचे धनुर्विद्या शिक्षण पूर्ण होईपर्यंतचा इतिहास, पांडवांचा पहिला वनवास आणि अज्ञातवास' आदि लेखांचा समावेश आहे. हे सारे लेख प्रसिद्ध झाले तर मणेरकर यांच्या साक्षेपी संशोधन-प्रयत्नांची कल्पना मराठी वाचकांना येऊ शकेल. हे सारे लेखन परिपूर्ण नसेल, आजच्या परिभाषेत कलापूर्णही नसेल परंतु त्यासाठी ह्या माणसाने केलेले अफाट वाचन, चिंतन, साधना

(पृष्ठ २६ वर पहा)






अनुक्रमणिका

दीपावलीचे सन्मानपुष्प

# हरहुन्नरी हुमणे



मराठीतील एक विनोदी लेखक, आताचे एक गाजलेले नाटककार (रूपांतरित नाटकांनीही माणसे गाजतातच असे नाही) एक कुशल प्रशासकीय संघटक, कल्पक बुद्धीचे एक्झिक्युटर आणि स्वागतशील व सहृदय मित्र, महाराष्ट्राच्या नव्या राजवटीतील अनेक सांस्कृतिक व समाजकल्याणकारी उपक्रमांचे शिल्पकार श्री. **राजाराम हुमणे** यांच्या नव्या नेमणुकीबद्दल अभिनंदन करताना वरील विचार माझ्या मनात आले. "हुमणे हॅज रिझन फ्रॉम रॅंक्स" असं त्यांच्या कर्तृत्वशाली विकसनाचे वर्णन थोडक्यात करता येईल. हुमणे हे पत्रकार होते. पुण्यात होते. मुंबईतही होते. परंतु हुमणे हे नाव महाराष्ट्रात अधिक माहीत झाले ते मात्र ते विनोदी लेखन करायला लागल्यापासून! ह्यापेक्षाही त्यांनी यश मिळविले ते मात्र सचिवालयात त्यांच्या वाटयाला आलेल्या खात्याच्या कामातून! 'कामातून' ह्या शब्दाला खूप महत्व आहे. महाराष्ट्र शासनाची 'सांस्कृतिक' आघाडी हुमणे यांनी चांगली (व चांगल्या) कामी लावली आणि आज त्याचे यश साऱ्यांनीच मान्य केले आहे. राज्य नाटच-स्पर्धा, चित्रपट म्होत्सव, लोकनाटचोत्सव, संगीत नाटचोत्सव, संगीत महोत्सव आदि अनेक उपक्रम आपल्या सांस्कृतिक क्षेत्राने रूढ केले आहेत आणि त्या उपक्रमांनी कितीतरी गोष्टी साधल्या आहेत. नवी नाटके, नाटककार, कलावंत स्त्री-पुरुष, दिग्दर्शक, नेपथ्यकार, थोर अनुवादक याजबरोबर एक सततचे 'नवे आव्हान' निर्माण केले आहे. वातावरण निर्माण केले आहे. आणि हे करीत असताना संघटकाची व प्रशासनाची आपली भूमिका त्यांनी यशस्वीपणे पार पाडली आहे. ते ह्या कलेच्या क्षेत्रात तर लोकप्रिय आहेतच, पण अधिक विश्वासपात्र आहेत, कर्तबगार आहेत हे ओळखून महाराष्ट्र शासनाने नव्यानच निर्माण केलेल्या संचालनालयाचे पहिले संचालक म्हणून राजाराम हुमणे यांचीच नियुक्ति केली! ही दुहेरी पावती मिळणे-मिळवण तसे अवघडच! जनता आणि शासन यांची जुगलबंदी नेहमीच चालते. अशावेळी हुमणे दुहेरी लोकप्रियता संपादू शकले ही गोष्ट त्यांच्या गुणवैशिष्टचांचीच निदर्शक मानायला हवी.

श्री. राजाराम हुमणे यांनी तुफानी लेखन केले नाही. पण आजचे एक लोकप्रिय विनोदी लेखक म्हणून नाव मिळवले आहे. अनेक दिवाळी अंकांना त्यांनी भूषविले आहे. हुमणे ह्याना साहित्य-संगीत-नाटच-लोकनाटच आदि सर्व कलात गति आहे. ते नुसते श्रोते नाहीत. संगीतज्ञ आहेत. प्रेक्षक नाहीत, नाटच जाणणारे आणि ते हेरून शब्दांकित करू शकणारे मर्मज्ञ लेखक आहेत. 'स्त्री–एक समुद्र' हे पुस्तक गाजले. आता 'प्रीति परि तुजवरती' हे नाटक गर्दी खेचीत आहे. त्या नाटकाने हुमणे यांजबद्दलच्या अपेक्षा वाढविल्या आहेत.

हा सारा प्रवास साधकाच्या निष्ठेने व शांतपणे कार्यरत राहून त्यांनी केला आहे हे मला ठाऊक आहे. म्हणूनच साधक हुमण्यांचे, हुन्नरी हुमण्यांचे मी नव्या नेमणुकीबद्दल अभिनंदन करतो. शासनाने हुमण्यांच्या गुणांचे चीज केले म्हणून शासनाचे अभिनंदन केल्याशिवाय हा अभिनंदन योग पूर्ण होईल असे वाटत नाही.

और आगे बढो, हुमणेशेठ!!

– संपादक

---

[ पान २४ वरून– **मणेरकर...** ]

ह्या गोष्टी काही कमी महत्त्वाच्या ठरू शकत नाहीत. मला कौतुक वाटते ते त्यांच्यातल्या ह्या प्रौढत्वी निज शैशव जपणाऱ्या कवीचे! गीता-वाचणारे पुष्कळ, प्रवचनकारही कमी नाहीत. पण आयुष्याचा क्षणन्क्षण गीतेचा कर्मयोग आचरणारे मणेरकर निदान आजतरी विरळोच. ह्या कर्मयोग्याला मी मानाचा मुजरा करतो. म्हापशाला नुकतेच 'सिहमुख व शिवलिंग सापडले. संशोधक मणेरकर आपले पुराव्याचे दस्तऐवज घेऊन म्हापशाला धावले. सारे संदर्भ त्यांनी मला दाखवले. नकाशे दाखवले. रेखाचित्रे दाखविली. 'खाद्य मिळाले' म्हणून हा ज्ञानाची मूक–प्रचंड भूक असलेला अठ्ठ्याहत्तरीतला तरुण माणूस गोव्याला गेला. ही उत्कटता, ही ज्ञानाची भूक, हा कर्मयोग आणि ही उद्यमशीलता–आम्हाला हवी आहे–नेहमी करता हवी आहे. ●●●











राम शिर्के



चन्देल वंशातील राजांचे वैभवशाली युग होते. या वंशाच्या राजवटीत विंध्य प्रदेशातील मंदिरांच्या नगराची अद्भूत निर्मिती झाली यालाच आता "खजुराहो" म्हणून ओळखतात. एकाच ठिकाणी अनेक देवळांचा समूह असलेलं हे खजुराहो त्याकाळी चन्देल वंशीय राजांच्या राजधानीचं शहर असावं. त्याकाळी 'महोत्सव नगर' म्हणून प्रसिद्धी पावलेलं चंदेलांच्या राजधानीचं दुसरं शहरही येथून जवळच आहे. आता ते 'महोबा' या अपभ्रंश नावाने ओळखले जाते. जेमतेम शंभर वर्षे राज्य असणाऱ्या चंदेलवंशीय राजांच्या राजवटीत ही देवळं कशी बांधली गेली याचे आश्चर्य वाटल्यावांचून राहात नाही. अल्पकाळ राज्य करणाऱ्या राजवंशाने आपले चिन्ह मात्र मागे असे ठेवले की, इतिहासाला कदापि त्यांचे विस्मरण होऊ नये.

त्याच अकराव्या शतकातील ही कथा आहे. कांदर्य महादेवाच्या देवळाचं काम मोठ्या वेगानं सुरू होतं तोच –

"टाकीचे घाव पडताच शिळा फुटतील शिल्पकार. . .पण त्या हसणार नाहीत . . . गाणार नाहीत. . नृत्य करणार नाहीत "

शिल्पकाराच्या हातातली टाकी गळून पडली. त्याने हातोडी दूर फेकून दिली नि विश्वकर्मा या नावानेच प्रसिद्धीस आलेल्या प्रमुख शिल्पकाराच्या पायावर लोळण घेतले.

आपल्याच कामात गर्क असलेल्या शिल्पकाराला विश्वकर्मा केव्हा मागे येऊन उभे राहिले ते समजलेच नव्हते.

प्रचंड जत्रा भरल्यासारखे वाटत होते. सागरी लाटांप्रमाणे जनसमुदाय सारखा

खजुराहो शिल्पकला विलासाच्या पार्श्वभूमीवरील ही संपूर्ण शृंगारिक कादंबरिका वाचकाला एका वेगळ्याच धुंद वातावरणात नेऊन सोडील....

हेलावत होता. लाटांच्या लयबद्ध ध्वनीने जसे सारे वातावरण भरून जाते तसेच तेथील वातावरण प्रचंड शिळा इकडून तिकडे नेणाऱ्या श्रमिकांच्या हुंकाराने भरून गेले होते. हत्तीसारखे प्राणीही अविश्रान्त खपत होते, दमत होते, चित्कारत होते. श्रमांची महागंगा दुथडी भरून वाहत होती. हजारो हात शिळा घडविण्यात गुंतले होते. त्यांच्या हातून होणाऱ्या टाक्यांचे आवाज ऐकू येत होते. प्रचंड मानव समुदाय अविश्रांत श्रम करणाऱ्या मधमाशांप्रमाणे कार्यरत असल्यामुळे एखाद्या पोळयाच्या जवळ उभे राहिल्यासारखे वाटत होते.

बांधकामास गंगेच्या प्रवाहाची गती आलेली होती तोच प्रवाहात दगड पडावा तसे झाले. विश्वकर्म्याने काम थांबवल्याचे सर्वांना समजले. या टोकापासून त्या टोकापावेतो शब्द गेला. एक तरंग उठला. हजारो हात थांबले. टाकीचे ध्वनी खंडित झाले हळहळू विरून गेले.

"काम थांबवले ?

"कां ?

"अहो ? या विश्वकर्म्यास काय हवंय ? "

"अशानं हे स्वर्गीय देऊळ कधी तयार तरी होईल काय ? "

"फारच चिवट माणूस आहे..कसलंच काम याच्या पसंतीला उतरत नाही.."

"याला काय हवंय हे आम्हाला याच्या हाताखाली राबून अजूनही नीटसं समजलेलं नाही...."

"याच्या लहरीपायी हजारो शिल्पकारांचे श्रम फुकट जातील..."

"अहो ! तुम्ही श्रमांचे काय घेऊन बसलात? ...सारे आयुष्यच फुकट जाईल अशाने !..."

"होय तर...! हजारो प्रतिमा घडवायच्या आहेत. त्या सगळयाच सुन्दर कशा होणार? ...मी म्हणतो एखादी जरा प्रमाणबद्ध नसली तर त्यात काय मोठंसं बिघडणार आहे?..."

"नाही तर काय ? ..एखाद्या प्रतिमेचं नाक थोडं बसकं झलं म्हणून महादेव लागलीच कोपणार का आहेत ?.

"महादेव आमच्या विश्वकर्म्याप्रमाणे वेडे का आहेत ? ते कशाला लक्ष देतील या निर्जीव शिळांकडे ? त्यांच्या भोवती आहेतच की, एकापेक्षा एक स्वर्गीय सुन्दरी आमच्या असंख्य देवदासी "

सगळे चर्चा करू लागले. जो तो बोलू लागला. खालच्या आवाजात का होईना, पण प्रत्येकजण आपला उद्वेग व्यक्त करू लागला. असंतोषाचा निखारा धुमसू लागला. पण सत्तेपुढे शहाणपण चालत नाही या भावनेनं जो तो आतल्या आतच धुमसत राहिला.

इतक्यात सगळीकडे एकच धावपळ उडाली. प्रचंड जयजयकार घुमू लागला, "महाराजांचा जयजयकार असो, श्रीमान धंगदेवांचा विजय असो ऽ ऽ...."

जो तो काम सोडून महाराजांचे दर्शन घ्यावयास धावू लागला. लोक धडपडू लागले. एकमेकांवर पडू लागले. गर्दी उसळली. महाराजांचे अंगरक्षक गर्दी आवरीत होते. प्रचंड शिळा ओढणारे गजराज जागेवरूनच चीत्कार करून सोंड मस्तकी लावून महाराजांना अभिवादन करू लागले. जयजयकार वातावरणात घुमू लागला, "महाराजांचा विजय असो ..."

तीन चार पुरुष उंचीचे बांधकाम पूर्ण झालेल्या वास्तूच्या एका पायरीवर वृद्ध विश्वकर्मा ताठ उभे होते. विश्वकर्मा आता वृद्ध झाले होते यात शंका नव्हती. बर्फाच्छादित शिखराप्रमाणे त्यांचे मस्तक आता पांढरे शुभ्र दिसत होते. अनंत धारांनी बाहेर पडणाऱ्या गंगोत्रीप्रमाणे दिसणाऱ्या धवल जटांनी त्यांचे उन्नत मस्तक अधिकच भारदस्त झाले होते. त्यांच्या भव्य ललाटी असणारे त्रिपुण्ड त्यांच्या भक्तीमय व्यक्तित्वाची साक्ष देत होते. पांढऱ्याशुभ्र दाढीने त्यांचा गोरापान चेहरा त्यांच्या व्यक्तित्वाच्या उठावास साहाय्यच करीत होता. हिमालयासारखा शेवटच्या पायरीवर म्हातारा ताठ उभा होता. सकाळची सूर्यकिरणे त्यांच्या भव्य, दिव्य आणि तेजस्वी व्यक्तिमत्वाभोवती वलय करून घुमली होती ! विश्वकर्म्याच्या कानी महाराजांचे आगमन सूचित करणारा जयध्वनी पडताच त्यांनी आपले उत्तरीय जरा सावरल्यासारखे केले नि ते पायऱ्या उतरू लागले.

महाराज पालखीतून बाहेर पडले. विश्वकर्मा खाली वाकले नि त्यांनी महाराजांच्या चरणास उजव्या हाताने स्पर्श करून धूळ मस्तकी धारण केली. महाराज पायऱ्या चढू लागले. त्यांच्याबरोबर चालू लागण्यापूर्वी विश्वकर्म्याने सहज मागे नजर टाकली. महाराजांबरोबर बराच मोठा लवाजमा होता. आमात्य, नर सेनापती, कोषाध्यक्ष सारी मंडळी होती. महारयपती, महावासुकाही दिसले नि उग्र चेहऱ्याचा, धुंद नजर असलेला पाताळयंत्री कपालिकही बरोबर होताच. विश्वकर्म्याची नि कपालिकाची नजरानजर झाली मात्र, विश्वकर्म्याने नजर झटकन वळवून महाराज्यांच्या पाठोपाठ चालावयास आरंभ केला. आपली नजर विटाळली असंच क्षणभर विश्वकर्म्यास वाटून त्यांचं सर्वांग शहारलं. शेवटच्या पायरीवर पोहोचताच धंगदेवांनी चोहोकडे दृष्टी टाकली. जिकडे तिकडे देवळंच देवळं! त्यांची उंच व सुंदर शिखरं, त्यावर चमकणारे असंख्य सुवर्ण कलश व फडफडणाऱ्या ध्वजा पताका पाहून धंगदेवांना मोठी प्रसन्नता वाटली. ते उल्हसित स्वरात म्हणाले, "आमच्या थोर पूर्वजांनी बांधलेली ही सुन्दर देवळं पाहूनच आम्हालाही वाटू लागलं की, आपण या देवळांपेक्षा सुंदरतेत जरा सरस असलेलं नि आकार प्रकारात यांच्यापेक्षा मोठं असलेलं देऊळ बांधून पूर्वजांच्या कीर्ती वैभवात आपल्या ओंजळीनं थोडीशी भर टाकावी ... काय आमात्य खरंय ना ?..."





अनुक्रमणिका

'होय् देव..' आमात्य हात जोडून विनम्रपणे मान वाकवून उत्तरले, "महारांजाची इच्छा सफल व्हावी हीच त्या भगवान महादेवाच्या चरणी प्रार्थना आहे.."

"पण मला वाटतं महाराजांची ही इच्छा या जन्मी तरी पूर्ण होणार नाही..." छद्मीपणे कपालिक म्हणाला.

सर्वांची दृष्टी त्याच्या उग्र चेहऱ्याकडे वळली. मादक द्रव्यांच्या धुंदीत सतत राहणाऱ्या कपालिकाचे निखाऱ्यासारखे वाटणारे नेत्र त्याच्या उग्रतेत अधिक भर घालीत. "कां? ..." महाराजांनी विचारलं, "कपालिकदेवांना असं कां वाटतं?.."

"कामाची गती पाहिलीत आपण?..." कडवट स्वरात कपालिक म्हणाला, "हजारो शिल्पकार काम थांवल्यामुळे हातावर हात ठेवून रिकामे वसून आहेत. त्या विचाऱ्यांना हे समजेनासे झाले आहे की, आपले प्रमुख शिल्पकार.. हे विश्वकर्मा यांना काय हवंय

"धृष्टतेवद्दल क्षमा करावी महाराज.." महाराजांची प्रश्नार्थक दृष्टी आपल्याकडे वळताच विश्वकर्मा नतमस्तक होऊन म्हणाले, "थोडा अवधी द्यावा म्हणजे समजेल मला काय हवंय" युगेही माझ्यावाजूनं साक्ष देतील महाराज.. मला काय हवंय ते युगे सांगतील देव...."

त्या प्रसंगानंतर मात्र विश्वकर्मा चिन्ताग्रस्त दिसू लागले. काम वंद पडल्यासारखे होते. ते कधी सुरू होईल हे समजत नव्हतं.

एक दिवस त्यांचा मुलगा आनंद त्यांच्या समोर येऊन उभा राहिला. तो विनयाने म्हणाला, "तात "

"काय वाळ?

"अलिकडे आपण असे चिंतातुर कां दिसता?

"पुत्रा उदासपणे विश्वकर्मा म्हणाले, "त्या दिवशी अहंकाराने मी महाराजांसमोर फार मोठी गोष्ट वोलून गेलो.."

"क्षमा करा तात आनंद म्हणाला, "तो अहंकार नव्हता.. कलावंताचा आत्मविश्वास जेव्हा प्रगट होतो तेव्हा तो याच सुरात प्रगट होतो.. मला अवधी द्या तात मी आपले शव्द खरे करून दाखवीन.."

आनंद विश्वकर्म्याच्या हाताखाली अगदी पित्याच्या वरोवरीने अलिकडे काम करू लागला होता. पण आपल्या कलेच्या सामर्थ्याविद्दल त्याच्या ठायी असा आत्मविश्वास जागृत झाला असेल याची मात्र त्यांना जाणीव झाली नव्हती. युवासंपन्न, तेजस्वी आनंदाचा आत्मविश्वासाने तळपणारा चेहरा त्यांनी अगदी नव्या दृष्टीने पाहिला नि तसा तो पाहतानाच त्यांचे डोळे चटकन भरून आले. आपल्याच पोटच्या पोराच्या आत्मविश्वासाची अद्याप आपल्याला जाणीव नसावी याचा त्यांना विषाद वाटल्यावाचून राहिला नाही; पण उशीरा का होईना झालेल्या जाणिवेनं ते आनंदलेही होते.

आनंदला वेड लागलं. तो देवळांमधील विविध शिल्पे पुनः पुनः न्याहाळून पाहू लागला. शिल्पकारांच्या कलेचं मर्म त्यात हुडकू लागला. जेव्हा पहावे तेव्हा तो गूढ चिंतनात गर्क दिसू लागला. कैलासाशी अगर मेरु पर्वताशी स्पर्धा करणारी शिखरं त्याला आव्हान देऊ लागली. स्वर्गसोपानाप्रमाणे केलेली त्यांची रचना पाहून त्याचं मन त्यावरून धावू लागलं उंच नि त्याहून अधिक उंच.

# [ २ ]

पित्यासमोर तासन् तास वसून आनंद चर्चा करू लागला. देवळाच्या वांधणीत समाविष्ट असलेलं प्रकृती नि पुरुष यांच्यासंबंधीचं तत्त्वज्ञान त्यानं समजून घेतलं. शिल्पकलेवर पडणारा कपालिकांच्या तांत्रिक विद्येचा प्रभाव नि त्यामुळे निर्माण होत असलेली मैथुनाची चित्रं यावर आपला उद्वेग प्रकट करू लागला. प्रतिमांचे गूढ रहस्य जाणून घेऊ लागला. त्यांच्यातून स्पष्ट केलेल्या तात्विक गोष्टी नि त्यासाठी वापरलेली प्रतीके समजावून घेऊ लागला. त्याचे हात तयार झाले होते, आता विचार वनू लागले. कल्पनेला विचारांचं खतपाणी मिळालं की वहर येतो. आनंदचं तसं झालं. या प्रतिमा शाश्वत सत्याची प्रतीकं आहेत याचा त्याला वोध होऊ लागला. चिरंतन सौंदर्याचा स्वर्गीय आविष्कार व्हावा यासाठी या पाषाणांमध्ये पंचप्राण ओतावे लागतील हे त्याच्या मनावर विवू लागले.

नित्याप्रमाणे तो त्या दिवशी अगदी पहाटे जेव्हा फिरावयास म्हणून वाहेर पडला त्यावेळी त्या अंधुक प्रकाशात सभोवतालच्या देवळांची सुवर्ण कलश असलेली उंच शिखरे तपश्चर्येसाठी ध्यानस्थ वसलेल्या ऋषिमुनींच्या मस्तकाप्रमाणे दिसत होती. रात्र अद्याप क्षितिजाच्या उंवरठ्यावर रेंगाळत होती. पक्षांचा कलकलाट वाढू लागला होता. तो तसाच सरोवराच्या दिशेनं चालू लागला.

सरोवराच्या ज्या किनाऱ्यावर फारशी वर्दळ नसावयाची त्या वाजूच्या घाटावर जाऊन वसण्याचा त्याचा नेहमीचा नियम होता. सरोवराच्या जलाशयात निळे तरंग उठत होते. अन् हवेत कुणाचे तरी हसणे खिदळणे रेंगाळत होते. चालता चालता आनंद जागेवरच थवकला. त्याच्या जागेवर आज कुणी त्याच्या आधीच येऊन तावा घेतल्याची त्याला जाणीव होताच त्याने परत फिरण्याचा वेत केला; पण त्याचे पायच उचलेचनात. घाटाच्या पायऱ्यांवर वस्त्रे ठेवून तीनचार तरुणी सरोवरात उतरल्या होत्या. त्यांची जलक्रीडा पाहात आनंद तसाच उभा राहिला. त्या तरुणींपैकी एकीचा स्वर उगीचच त्याच्या अंतरंगास गुदगुल्या करू लागला. तो स्वर पुनः पुनः कां ऐकावासा वाटावा याचा आनंदला







अनुक्रमणिका

बोध होईना. त्या स्वरात अशी कोणती जादू होती की, त्यामुळे त्याची अशी मोहान्ध झाल्यासारखी अवस्था व्हावी हे त्याला समजले नाही. आता दिवस चांगलाच उजाडला होता. देवळांची शिखरे दिसू लागली. त्यांच्यावरचे सुवर्ण कलश चमकू लागले. फडकणाऱ्या पताका दिसू लागल्या. नगारे वाजू लागले. सनईचे मधूर स्वर वातावरणात विहरू लागले. अन् मग आनंदच्या समोरचं दृष्य अधिकच स्पष्ट झालं. त्याला ते पाहता पाहता वाटलं की, कुमुदिनी नारीदेह धारण करून जलक्रीडा करीत आहेत. तो मुग्ध होऊन बघतच राहिला. त्या युवतींचं आनंदकडे लक्ष नव्हतं. त्या आपल्याच क्रीडेत मग्न होत्या. जरा वेळानं जेव्हा एकीचं लक्ष आनंदकडे गेलं तेव्हा ती किंचाळली नि त्यावरोबरच शिकाऱ्याच्या चाहुलीनं पाखरं भुर्रकन उडून जावीत तशा त्या तरुणी घाटाकडे वळल्या नि पाहता पाहता घाटावरील आपली वस्त्रे उचलून समोरच्या बागेकडे धूम पळत सुटल्या. त्यांची ती त्रेधा, धावपळ बघून आनंदला मोठी मौज वाटली. मोठ्यानं हसावं असं त्याला वाटलं.

पण त्या धावपळीत मोठी गंमतीची परिस्थिती निर्माण झाली.जाणाऱ्या सगळ्या तरुणी आपल्या एका मैत्रिणीस सोडून पळून गेल्या नि त्यातही एक खोडसाळ तरुणी तिची वस्त्रेही मुद्दामच घेऊन गेली असावी.

रवि-किरणांचा वर्षाव झाल्यामुळे सारे विश्व नव्या तेजाने तळपू लागले होते. पाना-फुलातून ठिबकत असलेले दव बिंदू पाहून क्षणभर वाटे की, प्रकृतीच्या ओठातून अमृत बिंदू सांडत होते काठोकाठ भरलेला अमृताचा पेला तोंडी लावल्यामुळे. परिसाच्या स्पर्शाने लोखंडाचे सोने व्हावे त्याप्रमाणे रविकिरणांचा स्पर्श ज्याला ज्याला म्हणून झाला होता ती वस्तू न् वस्तू सोनेरी दिसू लागली होती. तशातच ती तरुणी चांगलीच भांबावून गेली. वस्त्र तर अंगावर नाही. चावट रविकिरणं तिच्या अंगाअंगाला स्पर्शून ती अलंकारित करीत होती. नि समोर उभ्या असलेल्या तरुणाच्या दृष्टीचे भुंगे त्या लज्जेनं मिटणाऱ्या यौवनपुष्पाभोवती रुंजी घालून तिला अस्वस्थ करीत होते. शेवटी एका मोठ्या पायरीच्या शिळेचा आधार घेऊन ती तशीच अवघडून उभी राहिली अन् आपल्या डाव्या हातांनी तिनं आपले उन्नत वक्ष झाकण्याचा प्रयत्न केला. तसाच प्रयत्न तिनं उजव्या हातानं अनावृत्त मांड्या झाकण्यासाठी केला पण शेवटी ती अधिकच गोंधळून गेली. शरीराचा कोणता भाग झाकावा हेच तिला समजेना.

"अग् ऽऽ मालविके कुठं आहेस बाईऽऽ" किनाऱ्यालगतच्या बागेतील झुडपांच्या आडून कुणी तरी खट्याळपणे म्हटले नि लागलीच दुसरा स्वर उमटला, "बायांनो मालविका अथांग सागरात बुडाली की काय? अन् अग चाळ खणकावेत तसं मधुर हास्य त्या बागेत घुमलं. अंग चोरून दगडाच्या आश्रयाला उभी असलेली मालविका क्षणभर चिडल्यासारखी त्या आवाजाच्या दिशेनं बघत राहिली नि एखादी चिमणी भुर्रकन उडून जावी तशी ती त्याच अवस्थेत वेगानं पायऱ्या चढून बागेच्या दिशेकडे धूम पळत सुटली. बागेतील तरुणींची त्या प्रकारानं मोठी करमणूक झाली. त्या खट्याळपणे हसू लागल्या. पण बिचाऱ्या मालविकेचं नशीबही तिच्यावर त्या दिवशी उलटलं होतं. तिच्या मैत्रिणीं प्रमाणेच तेही पावलोपावली तिला अडवीत होतं. तिची फजिती करीत होतं नि खदखदून हसत होतं. पळणाऱ्या मालविकेच्या पायात मोठा काटा रुतला नि ती 'अयाऽऽ ईऽऽगऽऽ' म्हणत विव्हळत मटकन खाली बसली. मग पारधी मागं लागलेल्या सावजाप्रमाणे तिनं बुजलेल्या दृष्टीनं आनंदकडे पाहिलं. अंधारातही शिरणाऱ्या सर्वगामी सूर्यकिरणासारखा तो तिला भासला. मालविका एका अनामिक भावनेनं अधिकच बावरली. तो फक्त तिच्याकडे येत होता नि अंतरंगात खोल कुठंतरी अनामिक चाहूल लागत होती. कसली बरं ही चाहूल? हृदयाला पुलकित करणारी ! मन कमल्या प्रकाशानं तरी हळुहळू असं आलोकित कां व्हावं? बाई... बाईग ऽऽ हा मनाचा कोपरान् कोपरा उजळून टाकणारा दिव्य प्रकाश कोठून येतोय? ती धडपडत तशीच उठली नि तिनं एका आम्रवृक्षाच्या बुंध्याचा आधार घेतला. ती त्या वृक्षाच्या आडोशाला ताठ उभी राहिली. एका पायावर उभं राहून ती उजव्या पायातला काटा काढू लागली, पण त्याच वेळी तिच्या अधरांवर स्मिताची एक तेजस्वी रेखा

'सद्सद्विवेक बुद्धीचे' मोहिनी नृत्य




अनेक निवडणुकांत इंडिकेटला हादरा बसला

प्रगटली नि लज्जेच्या रंगानं तिचा सुंदर चेहरा आरक्त झाला. पापण्या फुलांच्या माराने लवलेल्या डहाळीगत खाली झुकल्या. आनंद मंत्रमुग्ध झाल्यासारखा समोर उभा होता. सौंदर्याचा तो अपूर्व, स्वर्गीय ठेवा पाहता पाहता त्याचे डोळे दिपले नि तो पटकन एक गुडघा टेकून जमिनीवर बसला नि मालविकेच्या उजव्या पायास आपल्या हाताचा आधार देत म्हणाला, "देवांगने क्षणभर थांब मीच तो भाग्यशाली काटा उपटून काढतो."

"मेला मला कसा बोचला . . . नि म्हणे भाग्यवान !" मालविकेनं दोन्ही हातांनी आपलं तोंड झाकून घेतलं. तिनं तसं लाजून केलं होतं की, काटा उपसला जात असता वेदना होऊ लागल्या म्हणून केलं होतं की, एका सुन्दर युवकाच्या प्रथम स्पर्शानं सर्वांग अनामिक भावनेनं थरारल्यामुळे केलं होतं कुणास ठाऊक !

"होय भाग्यवानच तो देवांगने . . . " काटा उपसताना आनंद म्हणाला, "तुझा पदस्पर्श होऊनही या धूलीकणांचं रूपांतर अद्याप फुलांमध्ये कसं झालं नाही याचंच मला आश्चर्य वाटतंय. विचारा काटा तुझ्या स्पर्शानं असा वेडावला की, नेहमी तुझ्यासंगे रहावे म्हणून रुतूनच बसला " हसत त्याने तो काटा उपटून फेकून दिला आणि उठून उभा राहिला.

"हे आर्यपुत्रा मालविका विनवण्याच्या सुरात म्हणाली, "दिवस चांगलाच उजाडला आहे. पौरजनांनी तुझ्यासंगे मला या अवस्थेत पाहिलं तर मोठा अनर्थ होईल. माझ्या चावट सख्याही दडून बसल्या आहेत माझी फजिती पाहत . . . तू जर बाजूला झालास तर मी निघून जाईन . . . "

"देवांगने . . पुन्हा याच ठिकाणी भेटण्याचं आश्वासन दिलंस म्हणजे मी पटकन निघून जाईन . . . आज सायंकाळी मी येथेच तुझी प्रतीक्षा करीन . . . "

"अवश्य येईन मी . . . " म्हणून मालविका झुडपाआड लपलेल्या आपल्या मैत्रिणींकडे निघून गेली नि तिकडून थट्टेचे खोडकर हास्य उसळल्याचे आनंदला ऐकू आले. आनंद परतला. सुराणाम् सौंदर्याच्या प्रथम साक्षात्काराचा हर्ष आनंदच्या हृदयात मावेना. आज कोडे सुटले होते. त्या दिव्य साक्षात्कारामुळे त्याच्या कलामनास वेढून बसलेला अंधःकार लुप्त झाला होता. त्याचे अंतरंग आलोकित झाले होते. त्याचा मार्ग उजळला होता. त्या उन्मादातच तो घरी परतला नि त्याने स्वतःस आपल्या शिल्पशाळेत कोंडून घेतले.

## [ ३ ]

विश्वकर्म्याला जेव्हा हे समजलं तेव्हा त्यांना फार आनंद व्हावा हे स्वाभाविकच होतं. टाकीचा आवाज त्यांना ऐकू आला तेव्हा तर ते इतके प्रसन्न झाले होते, जणू काही मधुर संगीताचे स्वर कानी पडून त्यांच्या अंतरंगास पुलकित करीत होते. त्यांनी शिवाचे स्मरण करून मनोमन याचना केली होती, "जय शिव ! जय शिव ! ! जय शिव ! ! ! माझ्या कलाकार पुत्राला वर द्या महाप्रभू . . . आपले सारे मांगल्य, सारे चैतन्य, सारी शक्ती त्याला द्या भगवान . . . जय शिव ! " अन् त्यांनी आपल्या वृद्ध पापण्यांच्या ओलावलेल्या कडा हळूच टिपल्या होत्या. नंदादीपाच्या मंगल प्रकाशाने उजळलेल्या देवमूर्तीसारखा त्या दिवशी आनंदचा चेहरा उजळलेला त्यांना दिसला होता. गर्भवती स्त्रीचा गर्भभाराने उल्हसित झालेला चेहरा जसा दिसतो तसाच सौंदर्याचा साक्षात्कार झाला की, कलावंताचा चेहरा तळपू लागतो हे अनुभवी विश्वकर्म्यांना ठाऊक होते. हज्जारदा त्यांच्या मनात आले होते की, आनंदला हृदयाशी कवटाळून विचारावे, " वत्सा ! तुला परमेश्वराच्या . . . . दिव्य सौंदर्याचा साक्षात्कार कसा झाला ? कुठे झाला ? कोणत्या मंगल क्षणी झाला हे मला सांग रे . . . " पण वृद्धाने मन आवरलं.

त्यादिवशी मालविका घरी परतली ती बरीच उशीरा. तिची आई मुकेनं आणि तहानेनं व्याकुळ झाली होती. विश्वनाथाच्या मंदिराच्या परिसरातच, पण जरा दूर एकांतात एका लहानशा झोपडीत मालविकेची आई उपेक्षित अवस्थेत पडून होती. महारोगानं कुजलेलं, दुर्गंधी सुटलेलं शरीर, विकृत, विद्रूप झालेला व भयानक दिसू लागलेला चेहरा, लपविण्यासाठी मालविकेच्या आईनं स्वतःस त्या झोपडीत कोंडून घेतलं होतं. सहसा ती कुणाच्याही दृष्टीस पडत नसे. एके वेळी जेव्हा ती भर तारुण्यात होती, तिचं अंग अंग यौवनानं फुललेलं होतं, उमललेलं होतं तेव्हा एकदा तरी ती दृष्टीस पडावी म्हणून देवळातील प्रमुख पुजारी, सामंत व पौरजन सारेच तळमळत असत तीच आता अशा केविलवाण्या अवस्थेत जगाच्या नजरेआड होऊन अष्टौप्रहर आपल्या दैहिक आणि मानसिक यातना एकटीच भोगीत पडली होती. मालविकेला आपल्या रोगाचा संसर्ग होऊ नये म्हणून तिनं तिला आपल्याजवळ ठेवून घेतले नव्हते. आपण जन्म दिला असला तरी आता आपली अमंगल, अशुभ छाया आपल्या लेकीवर पडू नये अशी तिची सात्विक इच्छा होती.

मालविकेला आईची आठवण उशीरा आली होती असं नव्हे, पण सरोवराकडून परतण्यास तिला विलंब झाला तो झालाच. मालविकेनं आईच्या झोपडीत प्रवेश केला तोच मुळी हसत हसत. लेकीचा आरक्त चेहरा, प्रसन्न वदन, धुंद नजर, गीत गुणगुणारे अधर पाहून आई दचकली. नव्यानेच पहावे तसे तिनेही त्या दिवशी मालविकेकडे नव्या दृष्टीनं पाहिलं. नजर वेधून घेणारे पुष्ट स्तन, सिंह कटी नि घोटीव नितंब, सुरमा घातल्यामुळे दीर्घ लोचना दिसणारी मालविका आज निराळी दिसत होती. दृष्य अलंकारांनी ती नटलेली असली तरी काही अदृष्य अलंकारांनी तिची काया भूषविलेली आहे असं मालविकेच्या आईच्या शंकाकुल मनात आल्याशिवाय राहीलं नाही ! कारण अदृश्य दैहिक अलंकार पुरुषाच्या स्पर्शावाचून स्त्री देहावर कधीच प्रगट होत नाहीत हे त्या अनुभवी स्त्रीला ठाऊक का नव्हतं ?

"आई आज अशी चमत्कारिक नजरेनं कां बघते आहेस ग माझ्याकडे ? . . . . . " मालविकेनं आईची नजर चुकवीत विचारलं.






"अग् मी इकडे तुझी वाट पाहून दमले नि तू होतीस कुठे इतका वेळ? ...काय करीत होतीस?..."

"आज बाई, सरोवरात विहार करण्यात किती वेळ मोडला ते लक्षातच राहिलं नाही. त्यात माझ्या पायात मेला काटाच रुतून बसला तो निघता निघेना. त्यामुळे उशीर झाला आज..."

मालविकेचा बदललेला स्वर, कावरीबावरी झालेली चंचल नजर नि जे काही सांगायचंय् ते सांगताना उडालेला तिचा गोंधळ यामुळे तिच्या आईचं समाधान होणं कसं शक्य होतं? उलट आपल्या तरुणपणी आपणही असल्याच लंगड्या सबबी सांगून वेळ मारून नेत होतो तसाच तर हा प्रकार नाही ना असं तिला वाटल्यावाचून राहिलं नाही.

## [ ४ ]

बऱ्याच दिवसांनंतर आनंदच्या आग्रहामुळे मालविकेनं त्याच्या घरी जाण्याची संमती दिली. मालविका घरी येणार आहे या जाणीवेनं त्या दिवशी आनंद असा काही हुरळून गेला की, तिच्या येण्याच्या किती तरी तास आधीपासूनच तो तिची प्रतीक्षा करू लागला. त्याला मुळी वेळेचं भानच राहिलं नाही. उगीचच त्याला वाटू लागलं की, मालविकेची येण्याची वेळ केव्हाच टळून गेली आहे नि या समजुतीपायी उगाचच तो अस्वस्थ झाला होता. नाना शंकाकुशंकांनी त्याला भंडावून सोडले होते. इतक्यात त्याला मालविका येताना दिसली. मग मात्र तिच्या चालीतील चपलता, अधीरता, आतुरता हेरून तो हसला. 'अरेच्या! माझ्याच प्रमाणे मालविकेलाही मला भेटण्याची घाई झाली आहे तर!'

त्याने शिल्पशाळेच्या दाराशीच तिला अडवून म्हटले, "हूं..हूं...अशी एकदम शिरू नकोस आत. जरा तिथेच थांब. मी तुझे डोळे झाकतो नि ते उघडीन त्याच वेळी तू समोवताली पहावयाचं"

मालविका हसली. पारिजातकाच्या डहाळीस कुणी हलवल्यानंतर असंख्य फुलांची पखरण होते ना तसंच तिचं ते हास्य. हिमालयाच्या कुशीतील गंगोत्रीसारखं निर्मळ, आनंदच्या अमृतमय ऊर्मी त्याच्या सर्वांगास पुलकित करून गेल्या. त्यानं डोळे मिटण्यापूर्वी हसतच मालविकेनं स्वतःच डोळे मिटून घेतले नि म्हणाली, "झाक बाबा माझे डोळे...आधीच प्रेमांध आहे मी..तुझ्याशिवाय मला काही दिसत असेल तर शपथ!" अन् ती उभी राहिली. आनंदनं तिचे डोळे झाकले नि तिला आत घेऊन गेला, "हं उघड आता डोळे" असं म्हणत आनंद जरा बाजूला सरून उभा राहिला.

मालविकेनं हळूच डोळे उघडले. आनंदच्या निकटतेनं, स्पर्शानं, श्वासानं तिचं सर्वांग पुलकित झाल्यामुळे तिच्यावर उन्मादाची धुंदी चढल्यासारखे झाले होते. आपण असेच डोळे मिटून आनंदच्या कुशीत शिरावं असं तिला वाटलं. आनंद इतक्या लवकर डोळे उघडील असं तिला वाटलं नव्हतं. सुखाचे ते उन्मादक क्षण इतके अपुरे पडले

त्यामुळे ती जराशी खट्टूच झाली होती. पण डोळे उघडताच ती हर्षातिशयाने ओरडली, "वाई ग ऽऽ हे काय ?....ही तर माझीच प्रतिमा..किती सुन्दर..अप्रतिम ...हे भगवान! मला या प्रतिमेपेक्षा अधिक सुंदर कां केलं नाहीस ? "

आनंद तिला खेटून उभा राहिला. डाव्या हाताने तिच्या कटिप्रदेशाभोवती विळखा घालून तिला जवळ ओढून घेत तो म्हणाला, "यालाच म्हणतात स्त्रियश्चरित्रम् ! अग् तुला आपल्याच प्रतिमेबद्दल ईर्षा वाटू लागली की काय ? ती तर तुझीच प्रतिमा आहे. तुझ्यापेक्षा ती अधिक सुन्दर कशी होईल ? पण ईर्षा हा तर स्त्री जातीचा मुख्य गुणच..स्वतःच्या प्रतिबिम्बाबद्दलही ईर्षा जर कुणास वाटली तर ती फक्त स्त्रीलाच !"

पण मालविका एकाएकी गम्भीर झालेली दिसली. ती अन्तर्मुख होऊन स्वगत बोलल्यागत म्हणाली, "आनंद, या प्रतिमेचा आधार मी असेन...पण या प्रतिमेच्या रूपाचा आविष्कार हा साक्षात् प्रकृतीच्याच रूपाचा आविष्कार आहे. त्यावर मी मर्त्य मानव कन्या आपला अधिकार कसा सांगू रे ? या अक्षय रूपाची स्वामिनी आहे प्रकृती..तिचंच हे प्रतिबिम्ब मालविका भावातुर होऊन बोलत राहिली, "निर्गुण...निराकार परमेश्वरालाही साकार करणारे कलावंत तुम्ही ! पण तिच्या सान्निध्यात आनंद देहभानच विसरला. त्याने तिला पुढे बोलूच दिले नाही.

मालविकेच्या बुद्धीचा चमत्कार आनंदने अद्याप पाहिला नव्हता. त्याने तिचे रूप पाहिले होते. अधरातले अमृत चाखले होते. प्रणियिनीच्या रूपातील तिचा दाहक उन्माद अनुभवला होता. तिच्या स्पर्शातील स्वर्गीय सुख भोगले होते. तिच्या नृत्यातली लयबद्धता पाहिली होती. तिच्या मधुर स्वरातली जादू त्याला मुग्ध करीत असे. तिच्या निर्मळ अंतःकरणाची, तिच्या अजोड प्रीतीची साक्ष त्याला पटलेली होती. पण कलेचं रसग्रहण करण्याच्या शक्तीचा आज प्रथमच त्याला प्रत्यय येत होता. ही अनुभूती नवीन होती.

"मी तुला ज्यावेळी नीट पाहिलं त्यावेळी तू त्या सरोवरातून बाहेर पडून उंच पायरीचा आश्रय घेतला होतास. आठवतंय ?"

"होय.." लाजून मालविका म्हणाली, "पण हा विंचू ? तो कशाला काढलात हो ? ..." खट्याळपणे आनंदाला चिमटा काढीत मालविकेनं म्हटलं, "तुम्हाला नाही दंश केला वाटतं यानं ? "

"छे ऽऽ छे ऽ असं कसं होईल ?" असं म्हणून आनंद मोठ्याने हसला व त्याने मालविकेला अधिकच जवळ ओढून घेतलं. "अन् हा प्रसंग आठवतो ? "

"न आठवायला काय झालं ? मेला तो काटा पायात त्यावेळी बोचला नसता तर मी कशाला या प्रेमाच्या जंजाळात गुरफटले असते ? माशासाठी एखाद्याने गळ लावून तो धरावा अगदी तस्स् झालं माझं ! आयतीच सापडले मी तुमच्या पाशात !"

"उद्या लोक ही प्रतिमा पाहतील मालविके, त्यावेळी त्यापैकी एकालाही ही कल्पना येणार नाही की, या मूक शिल्पाच्या उरात प्रथम मधुर मीलनाचा एक अमृतमय क्षण जपून ठेवलेला आहे एका कलावंताने !"

"खरंच कुणाला कल्पना येणार आहे यामागील प्रसंगाची ? "

"मालविके..."

"हूं

"वारंवार माझ्या मनात येतं की, या नगरीत अगणित देवदासी आहेत पण त्या सर्वाहून रूपाने, गुणाने तू वेगळी कशी ?.."

"चला..." त्याच्या खांद्यावर मान टेकून मालविका लडिवाळपणे म्हणाली होती, "हा सगळा तुमच्या प्रेमान्ध नजरेचाच चमत्कार दिसतोय ! नाही तर इतर देवदासींपेक्षा वेगळं दिसावं असं माझ्यात काय आहे वरं ?...मला तरी वाटतं स्त्रीचं रूप तिच्यावर प्रेम करणाऱ्या माणसाच्या दृष्टीत असतं..म्हणून तर पुरुष आपल्या प्रेयसीच्या रूपापुढे जगातील सर्व स्त्रियांचं रूप तुच्छ समजतो."

आता मालविका शिल्पशाळेत नेहमी येऊ लागली नि टाकीच्या रुक्ष आवाजाच्या पार्श्वभूमीवर तिथें असा प्रेमालाप, असं मधुर भाषण घुमू लागलं. सलगी वाढली. अंतर मिटलं. दोघंही एकाकार झाली.

मालविकेचे मादक अंगविक्षेप, धुंद करणारी हालचाल, तिच्या सुन्दर चेहऱ्यावरील चंचल, तरल सुखद भावलहरी आनंद अधाशासारखा पण अचूक टिपू लागला. अन् ते काव्य, ती अनुभूती सारं शिळेवर अंकित होऊं लाकलं.

"हे बघ मालविके...परवा विश्वनाथाच्या देवळात नृत्यासाठी तू चाळ बांधताना कशी उभी होतीस ते आठवतंय का?"

"कशी ?..." मालविकेनं अगदी तसे उभे राहून म्हणावं, "ही अशी ?"

"छट...खांबाचा आधार घेऊन तू डाव्या पायावर उभी होतीस नि उजव्या पायात चाळ बांधीत होतीस..हूं..हे असे..हं क्षणभर उभी रहा पाहू...".

"बाबारे ! सांगशील तश्शी उभी राहीन मी तुझ्यासाठी...नि सांगशील तितका वेळ उभी राहीन मग तर झालं ? "

"वेळेचं काय विचारतेस....युगानुयुगे तुला अस्संच उभं रहावं लागणार आहे.... समजलीस ?" आनंदने म्हणावं.

"बाऽईऽगऽ...."

शिल्प शाळेतून असा संवाद ऐकू येऊ लागला. मालविका तासन् तास आनंद सांगेल त्याप्रमाणे उभी राहू लागली त्याच्या शिल्पशाळेत. अवघडून जावयाची. थकायची पण तिनं कधी नकार दिला नाही. तहानभूक विसरून आनंद जसा आपल्या कामात गर्क होऊन जात असे तशीच तीदेखिल गुंग झालेली असावयाची. "हे घे घोटभर..." मद्याचा पेला तिच्या तोंडी लावून आनंद म्हणावयाचा, "कशी मरगळल्यासारखी दिसते आहेस...जरा ही आत पोटात गेली की, तरतरी येईल .."

"चल..तुझं काही तरीच

"हो-ना. म्हणून तर चेहरा झालाय असा रडवेला...उद्या या शिळांवर हेच कोरलं गेलं म्हणजे ?...."

"बरं बावा..." असं म्हणत मालविका पेल्यावर पेले ढोसू लागायची नि मग आनंद तिला आवरावयाचा, "एऽ काय मांडलयंस तूऽऽ" विचारी मालविका ओशाळून पेला ठेवून द्यावयाची. **

अनुक्रमणिका






[ ५ ]

पाहता पाहता आनंदची शिल्पशाळा मरून गेली. अनेक शिल्पकृतींनी ती भरली होती. प्रत्येक शिळा स्वतंत्र होती. प्रत्येकीवर एक स्वतंत्र प्रतिमा होती. स्वतंत्र भावाविष्कार होता; पण जणू काही एकाच महाकाव्याची ती पदे होती.

आनंदनं पित्याला तो पसारा दाखवला. पित्याचे भाव मायेच्या आवेगामुळे बोलके झाले नाहीत. ते आनंदाश्रूंच्या रूपातच पाझरू लागले. त्याच दिवशी दोघेही पिता-पुत्र धंगदेवांच्या राज्यसभेत गेले नि त्यांच्याकडून शिल्पशाळेस भेट देण्याचे आश्वासन घेऊन परतले.

धंगदेवांच्या स्वागताची जय्यत तयारी केली होती. महाराज आज विश्वकर्म्याच्या शिल्पशाळेला भेट देत आहेत ही बातमी सर्वत्र पसरली. अनेक शिल्पकारही मोठ्या उत्सुकतेनं त्या शिल्पशाळेकडे निघाले. ज्याच्या त्याच्या तोंडी तोच एक विषय झाला.

महाराज प्रदर्शन बघून स्तिमित झाले. आनंदच्या कला सामर्थ्याची त्यांना प्रचिती आली. त्यांना वाटलं आता या पुढच्याच क्षणी हे शिलाविश्व जागं होईल. ते आपला हर्ष लपवू शकले नाहीत. आनंदच्या पाठीवर हात ठेवून कौतुकानं विचारू लागले, "अरे आनंद ही देवांगना पायातला काटा उपसून झाला की निघून तर जाणार नाही? ... अन् ही चंद्राने मेघवस्त्रांनी स्वतःला झाकून घ्यावे त्याप्रमाणे वस्त्रे परिधान करून निघून गेली तर तिचं हे निथळणारं रूप पुनः कसं बघायला मिळेल? ... अन् ही देवांगना आरशातील स्वतःच्याच प्रतिबिम्बावर स्वतःच मुग्ध झाली तर आम्ही पामरांनी कुणासाठी वेडं व्हायचं?"

महाराज एक एक प्रतिमा बघू लागले. त्यातील भाव निरखू लागले. आशय हुडकू लागले व आपले मनोगत बोलून दाखवू लागले, "नाही. नाही.. हेच ते ममत्व.. अहंकार! ही चेंडू कधी टाकणार आहे? .... अन् हिचं चाळ बांधणं केव्हा पूर्ण होणार? आताच कानात चाळ घुमू लागले आहेत ... अन् हे प्रेमी युग्म ... प्रेमाची उत्कटता या सजीव चुंबनातून कशी बोलकी झाली आहे पहा ...! वाहवा ... आनंद तू निश्चितच आमच्या कृपेस पात्र आहेस हं!"

"कृतार्थ झालो देवा " असे म्हणत वृद्ध विश्वकर्म्यानं महाराजांच्या चरणास स्पर्श केला, "कलावंतांनी आपल्या कलेत ... शिल्पात ... प्रतिमांमध्ये .. आपले प्राण ओतावेत. पाषाणही बोलके व्हावेत यासाठी काम बंद पाडण्याची धृष्टता केली होती देव .. नाही तर देवळाला ओबडधोबड दगड बसवले काय नि कोरीव बसवले काय सारं सारखंच!"

"विश्वकर्मा हे नाव तुम्हाला देणारे आमचे पूज्य पिता किती विचारी होते हे आम्ही पाहतो आहोतच शिल्पकार.... बोलवा सर्व शिल्पकारांना .. दाखवा त्यांना हे नमुने .. अशी लयबद्धता, असा जिवंतपणा शिल्पात ओता म्हणावं ..."

महाकापालिक आतापावेतो मौन पाळून गप्प एकीकडे उभा होता. तो जाता जाता म्हणाला, "क्षमा करा देव ... आनंदनं अद्याप आपल्या कलेचं खरं मर्म सांगितलं नाही. या सगळ्या निर्मितीमागे प्रेरणा आहे एका तरुण, सुन्दर देवदासीची .. मला वाटतं विश्वनाथ देवळात असलेली नृत्य आदि कलांमध्ये प्रवीण अशी .. काय बरं तिचं नाव .. हूं .. मालविकाच नाही का? अन् त्याने छद्मीपणे डोळे मिचकावून आनंदकडे पाहिलं. महाराज हसले, "खरं की काय आनंद?"

आनंद नतमस्तक होऊन हात जोडून नम्रपणे फक्त मौन धोरण करून उभा राहिला.

"मालविका इतकी सुन्दर असेल असं यापूर्वी कधी वाटलं नव्हतं."

चमकून आनंदने कपालिकाच्या मुखाकडे पाहिलं. कपालिकाची पाशवी नजर अधाशासारखी मालविकेच्या प्रतिमांवर भिरभिरत होती. त्या नजरेतील अंगार आनंदला जाणवला. तो शहारला. कपालिकाचे शब्द मुंग्याप्रमाणे त्याचे कान पोखरू लागले.

[ ६ ]

महादेवाच्या देवळाचं काम आता नव्या दमाने पूर्ववत् सुरू झालं. आनंदच्या प्रतिकृती समोर ठेवून हजारो शिल्पकार त्याप्रमाणे प्रतिमा घडविण्याच्या उद्योगास लागले. आठशे नऊशे प्रतिमा घडविण्याचं प्रचंड काम होतं. शिल्पकार प्रतिमा घडवीत होते. विश्वकर्मा व आनंद त्या पाहत होते. त्या प्रतिमांवर सफाईचा हात फिरत होता. चमक आणण्याचे काम चालू होते. पूर्ण झालेल्या प्रतिमांच्या अवजड शिळा मजूर बांधकामापावेतो वाहून नेत होते. तेथे स्थपती, वेसुक, शिल्पी इत्यादींच्या मार्गदर्शनाखाली गवंडी जागेवर बसवीत होते.

विश्वकर्मा तरुणाच्या धडाडीने कामास लागलेले होते. महादेवाची स्थापना झाल्यावर त्या देवाला दंडवत घालावयाचा नि या कार्यातून निवृत्त व्हायचं असा त्यांचा बेत; पण नशीबात काही वेगळीच गोष्ट होती. एक प्रतिमा अवघड जागी स्थापन करता करता वृद्धाचा तोल गेला नि बऱ्याच उंचीवरून ते खाली कोसळले. सगळीकडे एकच हल्लकल्लोळ उडाला. काम सोडून जो तो अपघाताच्या स्थळी धावला. विश्वकर्म्याला बराच मार बसला. सर्वांग रक्तबंबाळ











झाले. त्यांची शुद्ध हरपली. आनंद धावत आला नि आपल्या रक्तबंबाळ जन्मदात्याचं डोकं मांडीवर ठेवून तो आक्रोश करू लागला. शरपंजरी पडलेल्या भीष्माप्रमाणेच तो थोर कलावंत दगडाच्या ढिगाऱ्यात पडला होता. राजवैद्यास बोलाविण्यात आले. जरा वेळानं विश्वकर्म्यानं मोठ्या कष्टानं डोळे उघडून पाणी मागितलं. त्यांची दृष्टी खोल गेली होती. आवाजही खोल गेला होता. त्यांना घरी घेऊन जाण्यासाठी पालखी आणलेली होती. इतक्यात त्यांच्या तोंडून शब्द ऐकू आले, "हर हर महादेव . . ." डोळ्यांची असाहाय्य धडपड दिसली. जड झालेल्या पापण्या डब्याच्या झाकणासारख्या घट्ट बसल्या होत्या त्या उघडण्याचा प्रयत्न चालला होता. शेवटी त्या उघडल्या नि आनंदवर वृद्धाची कातर दृष्टी खिळून बसली. आता ओठांची हालचाल सुरू झाली, "मला येथून हलवू नका . . ." क्षीण आवाजात अत्यंत कष्टाने विश्वकर्म्यांनी सांगितले, "मला महादेवाच्या या देवळाच्या पायाजवळच मरू द्या . . . परमेश्वराचीच तशी इच्छा आहे . ." पाणी पोटात गेल्यावर विश्वकर्म्याला अधिक हुशारी वाटू लागली. ते म्हणाले, "बाळ . . वत्सा, . . अरे आनंद . . . कसला शोक करतोस बाळा . . . या वास्तूला कलावंतांचा बळी मिळाला . . . शिल्पकाराच्या रक्ताचं अर्घ्य मिळालं बाळा . . . अजरामर होईल हे शिल्पविश्व ! . . . आनंद . . . शोक आवर बाळ . . . मला वचन हवंय . . . वचन . . ."

"वचन ? . . . तात वचन . . . ?" रडत रडतच शोकाकुल आनंदनं विचारलं.

"होय बाळ . . . वचन हवंय . . ."

"सांगा . . बोला तात . . ." कातर स्वरात आनंद म्हणाला, मी आजपावेतो कधीही तुमच्या वचनाबाहेर गेलो नाही . . . . कसलं वचन हवंय तात ? . . . बोला . . ."

विश्वकर्म्याचे शिणलेले डोळे मिटले. ओठ असाह्यपणे फडफडत राहिले, " महादेवाच्या या अद्वितीय देवालयावर जोपावेतो सुवर्ण कलश चढत नाही व गर्भगृहात शिवाची प्राणप्रतिष्ठा होत नाही तो पावेतो तू हातातली हत्यारे खाली ठेवणार नाहीस . . तरुण आहेस . . काही तरी निमित्त होईल नि तुझी ही तपश्चर्या भंगेल बाळा . . . महादेवाची ही पूजा बांधली आहे त्या पूजेत व्यत्यय येईल. खंड पडेल पोरा . . . म्हणून वचन . . ." विश्वकर्माला धाप लागली. पुढे बोलवेना.

"नाही हो तात . . नाही . . प्राणात प्राण असेतो मी कधीही हत्यारे खाली ठेवणार नाही . . . " असं म्हणता म्हणता आनंदने टाहो फोडला. विश्वकर्म्याची मान लवंडली होती. त्या अचेतन, निष्प्राण झालेल्या देहात आता काय उरलं होतं ? पण तरीही मृत विश्वकर्म्याच्या मुखावर समाधानाचं हास्य तसंच गोठलं होतं.

## [ ८ ]

मालविकेच्या आईस अलिकडे मालविकेबद्दल मोठी काळजी वाटू लागली होती. पित्याच्या मृत्यूनंतर आनंद एकटा राहिला तेव्हा त्याची काळजी मालविकेनं घेणं भागच होतं. नि ती तशी घेते यात मालविकेच्या आईला कसलीच चिन्ता वाटण्याचं कारण नव्हतं; पण कपालिकानं मालविकेच्या रूपाबद्दल सर्वांसमक्ष जे उद्‌गार काढले होते ते कानी पडल्यापासून मात्र ती फारच काळजीत होती. हे लक्षण चांगलं नाही अशी धास्तीच तिच्या मनानं घेतली होती.

एक दिवस मालविकेस परतण्यास बरीच रात्र झाली तेव्हा मात्र तिच्या मनानं धीरच सोडला. शरीरानं जर्जर झालेल्या त्या स्त्रीचं मनही खचलं होतं. अंधारातच ती बसून रडत राहिली.

दारात पाऊल ठेवताच आईचे हुंदके मालविकेच्या कानी पडले मात्र, ती चांगलीच दचकली. आईच्या अंगास ती स्पर्श करीत नसे. आईनंच तिला तशी शपथ घातलेली होती. आपला घाणेरडा रोग तिला लागू नये हीच तिची भावना. कापऱ्या हातानं मालविकेनं कोनाड्यातील दिवा पेटविला नि ती तशीच खाली मान घालून कोनाड्याशी भिंतीचा आधार घेऊन उभी राहिली. आईची समजूत कशी घालावी. तिची क्षमा कोणत्या तोंडानं मागावी हे तिला समजेना.

"आई ऽऽ रडतेस कां ग ऽऽ . . . " तिने कातर स्वरात विचारले. अलिकडे आपल्याकडून आईची आबाळ होऊ लागली आहे याची तिला जाणीव होती; पण दोन प्रिय माणसांमध्ये आणि दोघंही विकलावस्थेत असताना कुणाकडे अधिक लक्ष पुरवावं हे तिचं तिलाच कळेनासं झाल्यामुळे ती अधिकच गोंधळून गेली होती.

"मालविके बाई . . . मजजवळ बस जरा वेळ . . . तुझ्यांशी आज मला काही बोलावयाचं आहे. आता मी फार दिवस जगणार नाही . . ."

मालविका जरा अंतरावर ठेवलेल्या आसनावर बसली.

"तू आता आनंदचा नाद सोडावास हेच बरं . . ." भेदक दृष्टीनं कन्येकडे पाहत आईनं सुरूवात केली, "बरेच दिवस मी तुला हे सांगण्याचा विचार करतेय बाळ . . ."

"आई ऽऽ" विक्षिप्ताप्रमाणे मालविका अर्धवट किंचाळली, "तू काय सांगते आहेस हे ? . . कां सांगते आहेस ? . . आई हे बोलवतं कसं ग तुला ? . . ." बोलता बोलता मालविकेला मोठा उमाळा आला. ती मुसमुसून रडू लागली.

बराच वेळ ती तशी रडत होती नि एखादं विरलेलं वस्त्र उसवावं तसं तिच्या हुंदक्यांनी आईचं जीर्ण झालेलं मन उसवत होतं. लेकीला हृदयाशी आवळून तिची समजूत घालावी. तिच्या पाठीवरून मायेचा हात फिरवावा म्हणून मालविकेची आई तळमळू लागली. मोठ्या कष्टानं तिनं मन आवरलं. दुःखावेग कमी झाल्यावर ती हळुवार शब्दात म्हणाली, "मालविके अग मी तुझी आई ना ! . . . तुझ्यासाठी माझी आतडी कशी तुटतात हे कां तुला दिसत नाही ? या यातना भोगण्यापेक्षा मी केव्हाच प्राणत्याग केला असता; पण निव्वळ तुझ्या मोहानं . . . तुझ्या मायेनं मी जगले . . . बाळ स्वतःचीच घृणा वाटावी, तिरस्कार वाटावा, किळस यावी असं हे जीवन जगण्यात कुठला मोह आलाय वरं ! पण . . . ."

अनुक्रमणिका






"आई नको सांगूस ते . . ." हुंदके देत मालविका म्हणाली, "मला कळत का नाही हे ! तू असं बोलू लागलीस तर संपलंच सारं ! . . आजच मी तुझ्या कानावर एक गोष्ट घालावयाची ठरवलं होतं . . ."

"कसली ? . . ."

"लग्नाची . . . ."

"लग्नाची ? . . . कुणाच्या ?

"अग असं काय विचारतेस ? माझंन् कुणाचं ?

"कुणावरोबर ? .आनंदवरोबर ? "

"होय आई वरोवर ओळखलंस तू

"मालविके . . . . बाई तू शुद्धीवर आहेस काय ? अग् देवदासींना लग्न करण्याची परवानगी नाही . . . "

"कां ? "

"आपण देवदासी . . . . परमेश्वराचं कुंकू लावलंय आपण तोच आपला पती . . . अक्षय कौमार्याचं पालन करणं हाच आपला धर्म . . . . ! "

"आई तूच का सांगते आहेस हे ? देशोदेशीच्या असंख्य देवदासी आहेत या नगरीतील देवॊलयात . . . . आई त्यातली एक तरी आपले कौमार्य रक्षण झाल्याची ग्वाही उजळ माथ्यानं देऊ शकेल काय ?" आपले खालचे ओठ चावीत रागाने मालविका म्हणाली, "देवाच्या नावाचं कुंकू लावायचं नि अशक्य, असंभव्य दुर्धर अशा व्रताची शपथ घ्यायची आम्ही दुर्दैवी स्त्रियांनी अन् दुसरीकडून ब्राह्मण, पुरोहित, धर्माधिकारी, कापालिक सामन्त, सावकारांच्या भोगेच्छाही पूर्ण करावयाच्या. आई कुठलं खरंय यातलं ते सांग ?

"बाई काय सांगू तुला ? धर्माचं सारं थोतांडही हीच मंडळी माजवतात नि धर्मच्छेद, धर्म भ्रष्टताही हीच मंडळी करतात. देहावर रूपाचा साजशृंगार, तरुण मनातला ज्वालामुखी अन् समोवतालचं भोगवादी. उन्मादक वातावरण . . . . व्रताचरण घडायचं कसं ? त्यातूनही कुणी आचरायचं म्हटलं तर तेही अशक्य कोटीतील. मला का ठाऊक नाही ते !

"आई . . मग या अक्षय कौमार्याचा उच्चार का ? आग्रह का ? रागावू नकोस आई पण तुला जर हे सावलं असतं तर माझा जन्म कशाला झाला असता ? "

"हूं . . ." एक उसासा टाकून आई व्यथित स्वरात म्हणाली, "त्याचीच विषारी फळे चाखतेय बाळ. तुझ्याच वयाची होते त्यावेळी मोहान्ध झाले. एका युवकाच्या प्रेमात पडले नि बाळ ज्या भगवंताचं कुंकू लावलं त्यांच्याशीच प्रतारणा केली. व्यभिचार केला मी."

"आई . . . . आई काय बोलतेस हे ?" मालविका उसळून म्हणाली, "माझा जन्म पापात झाला ? आई ! काय म्हणतेस तू हे ? ज्या प्रेममय मीलनाच्या एका अमृत क्षणावरून हजारो वर्षांच्या खोट्यानाटचा, दांभिक जीवनास ओवाळून टाकलं तरी मागणार नाही असा तो क्षण ! माझा जन्म झाला तो त्या पवित्र . . . . मंगलमय क्षणात ! स्त्री आपल्या प्रेमिकास प्रथम समर्पण करते त्यासारखा मधुर नि मंगल क्षण त्याला तू पाप म्हणतेस ? नाही मी हे ऐकून घेणार नाही

मालविकेच्या आईने विस्मयचकित नजरेने वर पाहिलं. उभं आयुष्य ती जे ऐकत होती ते हेच की तिनं केलं ते पाप होतं, व्यभिचार होता तो ! दशदिशा जणू काही अहोरात्र तिला तेच ऐकवीत असत; पण पोटच्याच पोरीच्या तोंडून जेव्हा तिनं हे ऐकलं तर त्यावर पटकन तिचा विश्वासच बसेना ! न्यायदेवतेच्या दाराशी वर्षानुवर्षे एखाद्यानं न्यायाची याचना करीत वसून रडावं नि पूर्णपणे निराश झाल्यावर जीवनाच्या अंतिम क्षणी न्याय पदरी पडावा. . निरपराधित्व जाहीर व्हावं तसं झालं मालविकेच्या आईचं. ती हुरळून गेली. मालविकेच्या शब्दांनी जणू काही तिच्या जीवनाची मलीनता धुवून काढली. कलंक पुसून टाकला. तिला मोठा उमाळा आला. हृदयात कोठे तरी दडवून ठेवलेलं रडे आज प्रथम बाहेर पडले. न सांडलेले अश्रू एकाएकी सांडू लागले. आयुष्याचं अखेरीचं पर्व सुरू झालं होतं. पहिल्या पर्वात खाली झुकलेली मान आता उंच करण्याची संधी तिला लाभली. आत्मविश्वासाचा नवा प्रकाश उत्तरकाळी हृदयात पसरल्यासारखा झाला. मुलीस कवटाळाव . . . . हृदयाशी धरावं म्हणून ती तळमळली. मोठ्या कष्टानं तिनं आपल्या अनावर इच्छेस आवरलं.

जरा वेळानं ती आपल्या भावनांवर नियंत्रण करीत म्हणाली, "बाई . . . . तू म्हणतेस ते खरंय. आपल्या प्रेमिकाशिवाय मी कधीही आपला देह विटाळू दिला नाही. पण तरीही मी फार भोगलंय बाळ ! फार भोगलंय ! म्हणून पदोपदी मनात येतंय की, जे माझं झालंय ते आता तू तरी भोगू नयेस. तू आनंदचा विचार



"या माझ्या नवीन शिल्पाचं शीर्षक आहे 'हमाल'......!"



अनुक्रमणिका

सोडून द्यावा यातच सर्वांचं हीत आहे. नाहीतर सर्वनाश होईल... मुली माझं ऐक..."

"पाया पडते आई तुझ्या....पण अशी शापवाणी उच्चारू नकोस..."

"शापवाणी नव्हे.... त्रिकाल सत्यच सांगितलंय मी तुला. जे मी भोगलंय तेच....अगाणित देवदासींनी भोगलंय तेच.."

"कां भोगलंस आई? नीट सांग तरी... कां भोगलं?"

"तुझ्या वडिलांशी असाच लग्नाचा विचार केला होता मी. दूर देशी पळून जाणार होतो आम्ही पण. "

"पण....."

"पण त्याच वेळी एक घटना घडून आली. मुख्य कापालिकाने चक्रपूजेसाठी मला पाचारण केलं. चक्रपूजेत मला शक्तीचा मान मिळणार होता, पण प्रेमाच्या धुंदीत मी चक्क नकार दिला. महा-कपालिकाची निर्भत्सना केली. नुसतं झिडकारलंच नाही तर मी त्यांच्या पंचतंत्रांची टिंगल केली नि सर्वनाशाला निमंत्रण देऊन बसले. .."

"काय केलं त्यानं?"

"त्यांनी शक्तीला जो नरबली अर्पण करावयाचा त्यासाठी तुझ्या पित्याची निवड केली.... वाळ कसं सांगू? वासनेच्या नर्कातून स्वतःची काया मी वाचवली पण त्यांना दंड भोगावा लागला ...मृत्युदंड अन् तोही भयानक..."

"पुरे पुरे—आई नको सांगूस आता...." व्याकुळतेनं माल-विका म्हणाली. ती रात्र दोघींनीही रडून काढली.

मालविका भांबावून गेली. काय करावं हे तिला सुचेना. आनंद-पासून ही व्यथा कशी लपवावी हे तिला समजेना. तिचा गोंधळ उडू लागला.

"मालविके तुला झालंय काय?.. अग् तू अशी उदास कां अस-तेस! कोमेजलेल्या फुलासारखा तुझा चेहरा असा खिन्न का दिसतो? कसली तरी चिंता लागलेली आहे तुला....कां लपवतेस माझ्या-पासून? मालविके माझ्या हातून निर्माण होत असलेल्या या शेकडो देवांगना — सुरसुंदरी, गंधर्वकन्यांच्या प्रतिमांच्या मुखावरील सारे भाव मी तुझ्या मुखावरून घेतले आहेत. तुझं लाघवी हास्य... मधुर हास्य आता चिरंतन हास्य झालंय. या पाषाणांमध्ये गोठलंय ते. उन-पाऊस-वारा कुणीही ते पुसू शकणार नाहीत. मूर्तिभंजकांचे अमंगल हात आपल्या पाशवी प्रहाराने या प्रतिमा फोडतील पण त्यांनाही हे हास्य पुसता येणार नाही. अन् आता तू हे काय आरंभलं आहेस? या प्रतिमांच्या चेहऱ्यावर हे उदासीनतेचे भाव माझ्या हातून कोरले गेले तर काय होईल माहीत आहे? माझ्या या दुर्मुखलेल्या देवांगना बघून लोक म्हणतील स्वर्गातही सुखाचाच अभाव असला तर स्वर्गप्राप्तीसाठी आम्ही मर्त्य जी धडपड करतो ती व्यर्थच नाही काय?...."

मालविका खुदकन हसली, पण तरीही आनंदला समाधान झाले नाही. फाटण्याइतके कुणी रेशमी वस्त्र ताणल्यासारखे ते हास्य फिके वाटले. कृत्रिम वाटले.

मनातली भीति, साऱ्या व्यथा आनंदाच्या दृष्टीस पडू नयेत म्हणून मालविकेला हसावं लागे. स्वाभाविकरीत्या वागण्याचा प्रयत्न करावा लागे नि त्यात तिला मनस्वी यातना होत. मन पिर-गळल्यासारखे होई. आपल्या दुःखाची अमंगल छाया या अमर शिल्पा-वर पडून ते शापित ठरणार नाही याची दक्षता ती आपल्यापरीने घेत राहिली. तिचं लक्ष होतं महादेवाच्या उंचच उंच जाणाऱ्या शिखराकडे. त्यादिवशी ती आनंदचा निरोप घेऊन शिल्पशाळेतून बाहेर पडली तोच वाटेत तिची गाठ पडली आपल्या सख्यांशी. त्या तिला शोधीत आल्या होत्या. सुनयनेनं पुढे होऊन तिला विचारलं,

"अग तू आहेस तरी कुठे? विश्वनाथ मंदिरात महंत महाराजां-सह सारे तुझी वाट पहात आहेत.... आज शिवरात्र ना? तुझंच नृत्य मुद्दाम ठेवलंय आज.... ज्याच्या त्याच्या तोंडी झालीय ही गोष्ट अन् तू...."

"यात काय विशेष आहे?" मालविका उदासपणे म्हणाली, "नित्याचीच गोष्ट!"

"नित्याचीच?"

"नाही तर काय?"

"मला वाटलं, महंत महाराजांच्या तोंडून ही गोष्ट बाहेर पडल्यापासून सर्वांनाच समजली आहे. तशी ती तुला निश्चितपणेच कळली असावी."

"कसली?

"आज महा कापालिक महाराज म्हणे तुझ्या नृत्यासाठी मुद्दाम उपस्थित राहणार आहेत.... केवढी प्रचंड तयारी चालली आहे देवळात.... खरं सांगू? साऱ्या देवदासींना आत्ताच तुझ्या-बद्दल केवढी ईर्षा वाटू लागली आहे म्हणून सांगू!"....

पण जेव्हा मालविका गोठलेल्या नजरेनं नुसतं सुनयनेकडे पाहत राहिली तेव्हा सुनयना दचकली, "अग् अशी खुळ्यासारखी काय पाहतेस?"

स्वगत बोलल्याप्रमाणे मालविका भग्न स्वरात पुटपुटली, "काय म्हणालीस? आज कापालिक महाराज येणार? "

सुनयनेला आश्चर्य वाटलं, "काय हा खुळेपणा? या घटनेमुळे साऱ्या देवदासींना हिचा हेवा वाटतोय नि इकडे हिनं मात्र असा सुतकी चेहरा कां करावा? नवलच आहे बाई!

## [ ८ ]

नृत्यमंडपात विविध प्रकारचे दीप प्रज्वलित करून सर्व मंडपात दीपावली केली होती. चंदनाच्या सुवासिक धुपाने सारे वातावरण धुंद झाले होते. नंदादीपांच्या वर्तुळाकार मांडणीने तयार झालेल्या नृत्यमंचाभोवती प्रतिष्ठित मंडळी विराजमान झाली होती. गाद्यां-सारख्या जाड आणि मऊ आसनांवर वाद्ये वाजवणाऱ्या देवदासी चित्ताकर्षक वेषभूषा करून आपआपली वाद्ये घेऊन बसल्या होत्या. घनुर्वीणा व इतर तंतुवाद्ये, वासरी, मृदंगासारखी वाद्ये, कांश्यताल इ. वाद्यांचे स्वर जुळवले जात होते त्यामुळे त्या मंडपात संगीताचे





मधुर स्वर निनादंत होते. लोक वाट पाहत होते मालविकेची— मुख्य नर्तिकेची.

मालविका आली. तिचे चाळ घुमले नि सर्वांच्या नजरा वांघल्या गेल्या. दीपज्योतीप्रमाणे ते रूप नि तिचे ते अपूर्व तेज पाहून सर्वांचे डोळे दिपले. देवांगनांनाही लाजवील असे ते दिव्य रूप पाहून क्षणभर सर्वांना भ्रम झाला की, कुणी अप्सरा तर स्वर्गातून भूतलावर अवतरली नाही ना?

मालविकेनं भक्तिपूर्वक नृत्यदेवतेचं स्मरण केलं नि नंतर प्रेक्षक-वर्गाला अभिवादन केलं. त्याच वेळी तिची नजर महाराज कापालिकावर पडली. त्याच्या नजरेतील निखाऱ्यांनी तिचं काळीज चर्रकन करपलं. झटकन तिनं नजर वळवली नि शिवाचं स्मरण करीत मनोमन म्हटलं, "हे शिवा मला शक्ती दे देवा... शक्ती दे देवा... आपल्या कौमार्याचं रक्षण करण्याचं सामर्थ्य दे देवा. तूच मांगल्याचा देव आहेस....

मालविकेला साक्षात्कार झाल्यासारखे वाटले. निराशा, भय-व्याप्त अशा तिच्या अंतःकरणात दिव्य प्रकाश पसरला. एकाएकी नसानसातून शक्तीचा संचार होत आहे असं तिला वाटलं. तिनं ताल धरला. पाहता पाहता नृत्यदेवता तिच्या देहात संचारली.

त्या रात्री मालविकेनं सर्वांना थक्क करून टाकलं. आनंद मुद्दाम त्या नृत्यासाठी उपस्थित राहिला होता. त्याला तर ते अद्भुत नृत्य पाहणंच अशक्य झालं. भावावेगामुळे सारखा आनंदाश्रूंचा पूर येऊ लागला नि डोळ्यावर सप्तरंगी पडदा पडू लागला.

दुसऱ्या दिवशी मालविका झोपूनच राहिली. खूप थकली होती ती.

रात्री आरतीच्या वेळी जेव्हा ती देवळात गेली तेव्हा तिच्यावर आकाशातून पुष्पवृष्टी व्हावी अशी प्रशंसेची फुलं उधळली गेली. त्याचवेळी तिला महंताचा निरोप मिळाला. ती त्यांच्या भेटीसाठी गेली.

"ये...." तिच्या नमस्काराचा स्वीकार करीत ते म्हणाले, "पोरी तुझं भाग्य उदयाला आलं. वरीच पुण्याई खर्च केली तरी जे भाग्य देवदासींना सहसा लाभत नाही ते तुला लाभलंय....

महंतांचे उद्गार ऐकता ऐकता मालविकेच्या छातीत धडधड होऊ लागलं. अंगात कापरं भरल्यासारखं वाटलं.

"कापालिक महाराज तुझं नृत्य पाहून फारच प्रसन्न झाले नि त्यांनीच आपली इच्छा तुला कळविण्याचा मला आदेश दिला. ते तुला वर देणार आहेत फार मोठा...."

मालविकेचं डोकं गरगरू लागलं. तिचे हातपाय लटपट कापू लागले. रक्त गार होऊन गोठत आहे असं तिला वाटू लागलं.

"येत्या दुर्गाष्टमीला जेव्हा चक्रपूजेचा महान विधी होईल त्यावेळी शक्तीचा मान तुला देण्याचा निर्धार महाराजांनी केला आहे. या गुप्त आणि अवघड क्रिया करण्याचा नि साक्षात परमेश्वररूप होऊन सुख समाधीचा आनंद भोगण्याचा मान तुला मिळावा ही किती महत्त्वाची गोष्ट आहे बरं...."











पण महंतांचे बोलणे संपलेही नव्हते तोच मालविकेची शुद्ध हरपली.

"अरे हिला घेऊन चला.... महंताने आपल्या दूतींना बोलावून आदेश दिला." शिवरात्रीच्या नृत्यामुळे ती फारच शिणलेली दिसते. तिला तिच्या शय्यागृहात नेऊन ठेवा... "

सखींच्या प्रयत्नामुळे मालविकेला जरा वेळानं शुद्ध आली. मद्याचा एक पेला रिता केल्यानंतर तिला जरा तरतरी आली.

ती रात्र मालविकेनं विचार करण्यात घालवली. तिची झोप उडून गेली. कायमचीच उडून गेली.

## [ ९ ]

दुर्गाष्टमीचा दिवस उजाडला. देवदासींची कुत्सित दृष्टी तिच्यावर खिळून होती. ईर्षेने त्या तिच्याकडे पाहत होत्या. एक दोघी तर नववधूची थट्टा करावी तशा थाटात तिला कोपरखळी मारून म्हणाल्या होत्या, "बाई.... मोठी भाग्यवान आहेस बघ आज शक्तीचा मान मिळवणार नाही का?"

दुसरी म्हणाली होती, "आज चक्रपूजा नाही का? जीविताचं साफल्य झालं बघ...."

तिसरीनं तिचा मुका घेत म्हटलं होतं, "सखे, चक्रपूजेत काय काय करतात ते उद्या सांग बाई.... आम्ही कपाळकरंट्या .." उसासा टाकून ती म्हणाली होती, "आमच्या नशीबी कुठलं आलंय हे सुख!"

तिच्या अंतःकरणात पेटलेल्या यज्ञकुंडात त्या साऱ्याजणी जणू काही नकळत समिधा टाकीत होत्या. त्यांच्या त्या थट्टेमुळे अंतरंगात आगीचा डोंब उसळत होता. चंदनचर्चित सर्वांगातून दाह होत होता.

त्या रात्री आईचा निरोप घेता घेता मालविकेला आपला दुःखावेग आवरणं फार अवघडं झालं होतं. तिची ती विकल अवस्था आईच्या चाणाक्ष नजरेतून कशी सुटणार? शिवरात्रीच्या मालविकेच्या नृत्यासंबंधी कापालिकाकडून होणारी प्रशंसा तिच्या कानी आली होतीच.

मालविका दाराबाहेर पडली नि तिच्या आईच्या काळजात चर्र झालं. "अगबाई! आज दुर्गाष्टमीच! बाईग आज तर चक्रपूजा..." ती धडपडत उठली नि दारात जाऊन उभी राहिली. पण मालविका केव्हाच अदृश्य झाली होती. अमंगल, अशुभ कल्पनांनी तिला दंश केला. ते विष मस्तकात भिनलं नि ती कोसळली.

मालविका तेथून निघाली ती आनंदच्या शिल्पशाळेकडे चालू लागली.

शिल्पशाळेतून टाकीचा आवाज येत होता. तो ऐकताच मालविकेच्या व्यथित मनाला तडा गेला. तिला मोठ्ठा उमाळा आला. आपल्या वस्त्राचा बोळा तोंडात कोंबून तिनं आवंढा गिळण्याचा केविलवाणा प्रयत्न केला. आनंदचा निरोप घ्यावयाचा हसतमुखाने ..?.. त्याला मानतल्या व्यथेची, दुःखाची चाहूल लागू द्यावयाची नाही असा तिनं निर्धार केला होता. गेले कित्येक दिवस ती मनाला तयार करीत होती नि प्रत्यक्ष तो क्षण आला तेव्हा मात्र तिचा निर्धार विरघळू लागला. ती उंबरठ्यावरच थबकली नि ज्यावेळी तिला आपल्या मनाला आवरण्यात यश आलं त्यावेळी तिनं शिल्पशाळेत नित्याच्याच प्रसन्न मुद्रेनं प्रवेश केला.

"तू! " आनंदने आश्चर्याने विचारले, "या वेळी?"

मालविकेनं आनंदच्या कुशीत डोकं लपवीत म्हटलं, "मुद्दामच आले होते.... तू अहोरात्र काम करीत असतोस असं कानावर आलं होतं....म्हणून मुद्दामच आलेय मी स्वतः खात्री करून घेण्यासाठी... "

"मालविके..... केवढा मोठा शिल्पयज्ञ आहे हा! शिवाची महापूजा! ज्यावेळी या देवळावर सुवर्ण कलश बसवला जाईल व गर्भगृहात शिवलिंगाची स्थापना होईल तेव्हाच या महायज्ञाची पूर्तता होईल. तो पावेतो मला विश्रांती घेता येणार नाही. माझ्या जन्मदात्याचा आत्मा तो पावेतो असाच तळमळत नाही का राहणार?"

मालविकेच्या मनात आलं, "हा कसला यज्ञ! माझ्या प्रेमाची आहुती पडली की...." पण ती फक्त येवढंच म्हणाली, "होय आनंद... तुझ्या पित्यानं स्वतःच्या रक्ताचं अर्घ्य दिलंय यासाठी..."

"मालविके ते नेहमी म्हणायचे, 'बाबारे, कला ही युगानुयुगे जिवंत राहते. कलावंतानं तिला आपल्या क्षुद्र भावनांचा विटाळ होऊ देऊ नये. आपली दुःखे, आपल्या व्यथा, आपल्या चिंता, राग, द्वेष यांची सावली कलेवर पडता कामा नये. मोठं दिव्य आहे ते..' मोठी अवघड तपश्चर्या. तपश्चर्या म्हटली की भूक, तहान–विश्रांती यांची आठवणच राहत नाही. आकाश कोसळलं तरीही तपस्व्यानं तपश्चर्या भंगू द्यावयाची नसते!"

"हे शिव...." मालविका ते उद्गार ऐकून सुखावली. तिला धीर आला व तिच्या तोंडून निघून गेले, "तो सर्वशक्तिमान तुला बळ देवो हीच त्याच्या चरणी प्रार्थना..."

पण उसना आवेश सोडून जातोय अशी धास्ती तिला राहून राहून वाटतच होती. सागरतटी उभं राहिल्यावर कोवळ्या लाटांनी हळूच पायाखालची वाळू न्यावी तसे झाले होते. आतून व्यथेचे कढ येतच होते. दुःखाचा आवेग वाढत होता. प्रचंड लाटा मनाच्या भिंती फोडून बाहेर पडू पाहत होत्या. तिनं सारं कोसळण्यापूर्वी स्वतःस मुक्त केलं नि ती तेथून बाहेर पडली. आपल्याच अश्रूंच्या पायघड्यांवरून ती चालत राहिली.

चक्रपूजेची वेळ भरत आली होती. त्यापूर्वी तिला विश्वनाथ मंदिर गाठावयाचं होतं.

विश्वनाथ मंदिरात विविध देशातील ज्या देवदासी होत्या त्यातच एक नागकन्याही होती. अत्यंत विषारी नाग ती पाळीत असे नि त्या नागांना पुष्पमालांप्रमाणे सर्वांगावर गुंडाळून ती मोठे कामुक नि दाहक नृत्य करणारी नृत्यांगना म्हणून प्रसिद्ध झाली होती.










मालविका तिच्या दारात मलत्याच वेळी दत्त म्हणून उभी राहिली.

"सखे नागकन्ये.. माझी एक विनंती मान्य करशील काय?"

"काय ग बाई? " मलत्याच वेळी मालविकेचं अकस्मात होणारं आगमन पाहून आश्चर्यचकित होत त्या देवदासीनं पृच्छा केली. तिला ते नवलच वाटलं.

"आज चक्रपूजा आहे....

"ऐकलंय ते मी.....

"त्या विधीत मी एक नवीन नृत्य सादर करून कापालिक महाराजांना प्रसन्न करण्याचा निश्चय केलाय...."

"कोणतं नृत्यं?

"नाग नृत्य.

"काय तू? तू नागनृत्य करणार?

"होय. मी करणार आहे. म्हणून तर तुझ्याकडे आले आहे मी एक नाग मागण्यासाठी..

"नाग? बाई माझे नाग फार कोपिष्ट अन् विषारी आहेत. एखाद्यानं जर दंश केला तर पाणी मागण्याचीसुद्धा सोय नाही...."

"अग कापालिक महाराज म्हणजे साक्षात् परमेश्वरच.... त्यांच्या सानिध्यात सर्पदंशाची भीतीच बाळगावयाचं काही कारण आहे का?"

ती सखी निरुत्तर झाली. कापालिकांची अधिसत्ता, त्यांचे दैवी सामर्थ्य यांना आव्हान देण्याची त्या नागकन्येची का पात्रता होती? ती आत गेली नि एक करंडी आणून देत म्हणाली, "यात माझा लाडका शिवनाग आहे. स्वभावाने फार कोपिष्ट नि अत्यंत विषारी वरं.... जरा सावधगिरीनंच हाताळ त्याला."

ती करंडी हाती घेत मालविका म्हणाली, "तू यत्किंचितही काळजी करू नकोस. चलते बाई... तिकडे आता मंडळी माझी वाट पहात असतील...."

विश्वनाथ देवळाच्या दिशेनं वेगानं जात असलेल्या मालविकेच्या पाठमोऱ्या आकृतीकडे ती नागकन्या स्तिमित होऊन पाहात राहिली.

मालविकेनं देवळात प्रवेश केला त्यावेळी तेथे संपूर्ण नीरवता होती. दिव्यांचा पिवळट, मंद प्रकाश सर्वत्र पसरलेला होता. गाभाऱ्यातील प्रचंड नंदादीपांच्या प्रकाशात गर्भगृह उजळून निघाले होते. महादेवाच्या पिंडीवरील पाच फडा काढलेल्या सुवर्ण भुजंगाच्या डोळ्यातील हिरे त्या तेजात लकाकत असल्यामुळे तो जिवंत असल्याचा भास होत होता. देवापुढे सतत जळत असणारा चंदनाचा सुगंध सर्वत्र भरून राहिला होता. प्रदक्षिणापथात वरच्या महिरापीस बांधलेल्या सोन्या-रूप्याच्या बारीक घण्टा मधूनच वाऱ्याच्या झुळकीबरोबर जो मंधूर नाद करीत तो सभा मंडपात निनादत राही.

मालविका अद्याप कशी आली नाही म्हणून कापालिकाचे शिष्य तिच्या शोधात बाहेर पडले होते. मध्यरात्र उलटून गेली तरी आनंद शिल्पशाळेत आपल्या कामात गर्क होता. ते शिष्य तेथे गेले. कापालिकाचे शिष्य आज मालविकेचा यावेळी शोध करीत आहेत हे पाहून आनंदच्या काळजात चर्र झालं. मालविकेच्या आईची हकिगत त्याला कळलेलीच होती. त्यात आज दुर्गाष्टमी होती. म्हणजे या नराधमांचा चक्रपूजेचा दिवस. सारा प्रसंग आनंदच्या समोर उभा राहिला. मालविकेचं अवेळी येणं नि तिचं ते विचित्र बोलणं, वागण्यातली गूढता त्याला आठवताच तो हादरला.

"ती घरी असेल.. असं तो म्हणाला. त्यावर एका आडदांड वृत्तीच्या शिष्यानं घमेंडीत उत्तर दिलं, "नाही. ती तेथे असेल असं समजून आम्ही गेलो होतो, पण ती नव्हती..

"मग मी काहीच सांगू शकणार नाही. " आनंद म्हणाला.

"कदाचित ती कोठेच सापडणार नाही आता. छद्मीपणे हसून तोच घमेंडखोर शिष्य म्हणाला, "आमचे कापालिक महाराज त्रिकालज्ञ आहेत. ते तिला पाताळातूनही हुडकून काढतील अन् ते तिच्या शोधात तेथून बाहेर पडले.

आनंद विक्षिप्तासारखा बाहेर पडला. ते शिष्य विश्वनाथ देवळाकडे निघाले आहेत हे पाहून तोही त्यांच्या पाठोपाठ देवळाकडे गेला. शेवटच्या पायरीवर त्याला ते दोन दूत दिसले. नि तोच त्याच्या कानांवर कुणातरी स्त्रीचा कठोर आज्ञेचा स्वर पडला, "थांबा, दुष्टांनो. .मालविका देवदासी होती. तिचं कौमार्य या सर्वशक्तीमान शिवास अर्पित होतं. जाऊन सांगा आपल्या त्या कापालिक महाराजांना की, तुम्ही तिला नेण्यासाठी किंचित उशीरा आलात. त्यापूर्वीच भगवान शंकराचा दूत घेऊन गेला तिला शिवलोकात. तो पहा...."

गाभाऱ्याचा उंच सोनेरी उंबरठा चढून आत प्रवेश करीत असलेला एक भयानक नाग सर्वांना दिसला. क्षणार्धात तो गाभाऱ्यात अदृश्य झाला. ते पाहून आनंद भ्रमिष्टासारखा किंचाळला. नि त्या दोन दूतांना बाजूला सारून समोर धावला. त्याची किंकाळी "मालविका..." त्या देवळात बराच वेळ घुमत राहिली नि हळूहळू घंटानादात विरघळून गेली.

त्याने मालविकेची फुलासारखी कोमल काया उचलून घेतली. सारी काया काळवंडली होती. मृत्यूनं प्रकाश पिऊन टाकला होता. पण तिच्या मुखावरचं स्वर्गीय हास्य मात्र मृत्यूही पुसू शकला नव्हता. त्या निष्कलंकित, मंगल नि शाश्वत हास्याकडे आनंद विक्षिप्तासारखा मोहमुग्ध होऊन पाहतच राहिला. संश्लेषाचं, समाधानाचं तेज त्या अलौकिक हास्यातून बाहेर पडत होतं.

खजुराहोचा शिल्पयज्ञ पूर्ण झाला.

काळ पालटला. त्या ठिकाणी निर्मात्यांची जागा विध्वंसकांनी घेतली. साऱ्या शिल्पावर कठोर प्रहार झाले. पण मालविकेचं हास्य अंकित असलेल्या शिळा अद्याप अनेक प्रहार सहन करीत उभ्या आहेत. त्या मूक हास्याला वाचा फुटेली तर? अमर काव्याचा जन्म होईल. कारण त्या मौनात अद्याप काही तरी गूढ दडलेलं आहे असं वाटल्यावाचून रहात नाही. ● ● ●





# नरकासुराची वंशावळ आणि आर्यधर्मप्रसार

— माधव राजवाडे

**..... आर्यधर्मप्रचारक आणि विष्णूचा पुत्र असूनही नरकासुराला 'असूर' मानण्यात त्याच्यावर अन्यायच होत आहे...तसेच दिवाळीतील नर्कचतुर्दशीशी त्याचा संबंध जोडणेही उचित नव्हे......**

**'दीपावली'च्या मे १९७० च्या अंकात प्रसिद्ध झालेल्या लेखाचा हा उत्तरार्ध..**



भारत सम्राट हर्षवर्धन याची व युवान्‌ची गांठभेट गंगाकिनारी झाली. त्या भेटीत महायान बुद्धधर्माची हीनयान बुद्धांना खरी ओळख पटवून देण्यासाठी एक धार्मिक परिषद कनौज येथे बोलावण्याचे ठरले. ही परिषद इ. स. ६४३ मध्ये भरली. त्यात एकंदर १९ राजे उपस्थित होते व हजाराचे वर बौद्ध भिक्षुक. ह्या दीक्षान्त समारंभात सम्राट हर्षाने भास्कराला शैवपंथी असूनही बहुमानाचे उच्चस्थान किंबहुना निजसमान स्थान देऊन आपल्या ज्वलंत मैत्रीची ग्वाही दिली. एवढेच नव्हे तर कनौजनंतर प्रयाग येथे भरलेल्या महामोक्ष परिषदेतसुद्धा तेच बहुमानाचे स्थान पुनश्च दिले.

सर्वत्र प्राप्त वर्णनावरून राजा भास्कर वर्मन प्रख्यात व दिग्विजयी होऊन गेला हे प्रमाण सिद्ध ठरते. राजा भास्करवर्मन सुमारे इ. स. ६५० मध्ये दिवंगत झाला असावा. तो मरेपर्यंत त्यास कुमारराजा म्हणण्याची प्रथा असे. ह्याला दोन कारणे असू शकतात. प्रथम तर तो युवराज नसून द्वितीय राजकुमार होता. व दुसरे म्हणजे तो ब्रह्मचारी असावा. त्याचे नंतर अवंतीवर्मन् राजा झाला पण त्याचे भास्कराशी काय नाते होते हे ज्ञात नाही. अवंतीवर्मन्‌ने प्रायः ५ वर्षे राज्य केल्यानंतर वर्मन राजवंशाचा लोप झाला व राज्यात विप्लव झाले. हा काळ सुमारे इ. स. ६६० चा असावा. ह्या राज्यविप्लवाचा बोध पालवंशीय द्वितीय राजा रत्नपाल याच्या ताम्रशासनात मिळतो.

विप्लवकाळी परिस्थितीचा फायदा घेऊन शालस्तम्भ ह्या म्लेंच्छ सरदाराने राज्य काबीज केले असे ते ताम्रपत्रक म्हणते.

> एवम् वंशक्रमेण क्षितीमथ निखिलाम् भुंजताम नारकाणाम्।
> राज्ञाम् म्लेंच्छाधिनाथो विधिचलनवशादेव जग्राह राज्यम्॥
> शालस्तम्भ क्रमेस्यापि हि नरपतयो विग्रहस्तम्भमुख्या।
> (वडगावचे ताम्रपत्रक)

म्लेंच्छाधिनाथ म्हणजे म्लेंच्छ प्रदेशाचा अधिनाथ अर्थात् सांप्रतचे रूढ भाषेत राज्यपाल अर्थात् गव्हर्नर असावा. म्लेंच्छ प्रदेश म्हणजे आज ज्या ठिकाणी मेच जातीचे लोक आसाममध्ये वास करीत आहेत तोच असावा. कारण मेच हा म्लेंच्छ शब्दाचा अपभ्रंश आहे. शालस्तम्भ वंशीय राजांचा काळ दाखल्यावरून सिद्ध झाला आहे व त्या वंशाचे एकंदर २१ राजांनी प्रायः ३०० वर्षे राज्य केले ह्यालाही प्रमाणे आहेत.

## शालस्तम्भ वंश

शालस्तम्भ वंशीय राजे हर्जरवर्मा, बलवर्मा व वनमाल तसेच पालवंशीय राजा रत्नपाल यांचे उपलब्ध ताम्रपत्रावरून संकलित केलेली शालस्तम्भ वंशलतिका इतिप्रमाणे :—

| | |
|---|---|
| शालस्तम्भ | —सातवी शताब्दी शेषार्ध |
| विजय (विग्रहस्तम्भ) | |
| पालक | —आठवी शताब्दी. |
| कुमार | |
| वज्रदेव | |
| हर्षदेव वा श्री हरिष | (इ. स. ७४८ ते ७५८ चे सुमारास) |
| बलवर्मा | |
| चक्र | |
| अरथि | |
| आरथ | |
| प्रालम्भ—जीवदा वा जीवदेवी | —नववी शताब्दी |
| हर्जर – मंगलश्री | इ. स. ८२९–३० |

वनमाल
जयमाल (वीरबाहू)—अश्वा
बलवर्मा
×
×
×
×
त्यागसिंग

मृत्यु इ. स. ९८५.

शालस्तम्म घराण्याचा काळ अंदाजे इ. स. ६५५ ते इ. स. ९८५-पर्यंतचा होता. ताम्रपत्रक विशेषज्ञ डॉ. हर्व ली यांनी अक्षरांचे पर्यालोचन करून प्रतिपादले आहे की भास्करवर्माच्या मृत्यूनंतर थोड्याच वर्षात शालस्तम्भाने वर्मन वंशजाकडून राज्यग्रहण केले असावे. नेपाळातील पशुपतिनाथ मंदिराच्या पश्चिमद्वाराच्या सन्मुख वृषभाच्या पश्चाद्भागी असलेल्या एकखण्ड कृष्णप्रस्तरावर खोदलेल्या शिलालेखावरून राजा हर्षदेवाचा काळ हर्षाब्द १५३ म्हणजे इ. स. ७५८ ठरतो. प्रत्येक राजाने सरासरी २० वर्षे राज्य केले असे अनुमान धरले तर शालस्तम्भाचा काळ भास्करवर्मनचा होतो ह्या अनुमानास दुजोरा मिळतो. दरांग जिल्ह्याचे मुख्यस्थान तेझपूर या शहराच्या सन्निकट ब्रह्मपुत्रा नदीच्या तीरी एका पाषाणलेखात राजा हर्जरवर्माचे नाव आहे व गुप्त संवत ५१० असा अब्दांक स्पष्ट लिहिला आहे. गुप्त ५१० म्हणजे इ. स. ८२९–३० वर्ष. ह्यावरून हर्जराचा काळ प्रमाणसिद्ध होतो. तसेच वंशातील शेवटचा अर्थात २१ वा राजा त्यागसिंग निपुत्रिक वारल्यानंतर पालवंशीय ब्रह्मपाल इ. स. ९८५ मध्ये राजा झाला हेही ज्ञात आहे.

शालस्तम्भाला राजा रत्नपाल जरी म्लेंच्छाधिनाथ म्हणतो तरी शालस्तम्भ वंशीय राजे स्वतःस नरक-भगदत्ताचे वंशधर म्हणूनच उल्लेखितात. एवढेच नव्हे तर त्यांच्या शासनाचे सीलसुद्धा हस्तीमूर्ती समन्वित आकार होते. त्याला ताम्रपत्रकात व शिलालेखात आधार आहेत. इतिपूर्व उल्लेखिलेल्या पशुपतिनाथाच्या मंदिरातील शिलालेखात नेपाळच्या राजा जयपालाने भगदत्तवंशीय राजा श्री हर्षदेवाची आत्मजा देवी राज्यमतीशी विवाह केला असे म्हटले आहे: (इ. स. ७४८)

श्री हर्षदेवात्मजा देवी राज्यमती कुलोचित गुणैर्युक्ता।
प्रभुता कुलैर्येनोढा भगदत्तराजकुलजा लक्ष्मीरीवक्ष्माभुजा ।।

राजा वनमालच्या तेजपूर ताम्रपत्रकात प्रलम्भ यांचा भगदत्त वंशीय असा उल्लेख आहे

संप्राप्तो भगदत्तः श्रीमत्प्राग्ज्योतिषवधिनाथत्वम्।
तस्यान्वये मूक्षितीपाल मौलिमाणिक्यरोचिः स्फुरितांघ्रिपीठः।
प्राग्ज्योतिषेशः क्षतवैरिवीरः प्रालम्भ इत्यद्भुतनामधेय :।।

राजा रत्नपाल हा राजा प्रालम्भाचा नातू. नेपाळच्या शिलालेखात श्री हर्षदेवाला "गौडोद्रादी–कलिंग–कोसल पति" असेही म्हटले आहे. हर्षदेवाने आपला एक नातेवाईक श्री क्षेमांकर देव यांस 'ओद्राधिपति' नेमले. क्षेमांकर व त्याचे वंशजही स्वतःला 'भौम' असे विशेषण लावतात. भूमिपत्र नरक ह्यास भौमासूर असेही नाव होते. हर्षाचा नातेवाईक जर नरकापासून आपला उगम प्रकटपणे दर्शवितो तर हर्षाच्या सम्बन्धीही तेच म्हणता येते.

## हरुपेश्वर म्हणजे सध्याचे तेजपूर

शालस्तम्भ वंशीय राजे हर्जरवर्मन, वनमाल व बलवर्मा यांच्या ताम्रपत्रकावरून ते सर्वच हरुपेश्वर नामक स्थानी शासनारूढ होते. हे नगर कोठे होते ह्याचा पक्का अंदाज जरी करता येत नाही तरी ब्रह्मपुत्रेच्या तीरी उत्तरेस ते असावे. किंबहुना आजचे तेजपूर म्हणजेच हरुपेश्वर असावे असे मानतात. नरकापासून ते भास्करापर्यंत सर्वच राजे प्राग्ज्योतिषपुरी (म्हणजे गुवाहाटी) राज्य करीत. शालस्तम्भाने राज्यग्रहण केल्यानंतर तो प्राग्ज्योतिषपुरी राज्य-शासन करण्यास वजला नसावा व ज्या अंचलाचा तो अधिनाथ त्याच अंचलातील हरुपेश्वरी त्याने राजधानी वसवली असा तर्क आहे. राजधानी कोठेही असली तरी हे स्वतःस भगदत्त वंशीय समजणारे शालस्तम्भाचे वंशजसुद्धा आर्यधर्माचे जोरदार पुरस्कर्ते होते हे उपलब्ध तीनही ताम्रपत्रकावरून निःसंशय सिद्ध होते. तेजपूर येथे सांपडलेल्या राजा वनमालाच्या ताम्रपत्रद्वारा, 'शाण्डिल्य गोत्रप्रदीप वेदार्थविद् भिज्जट नामक पवित्र देवोचिद् गुणयुक्त व सांग यजुर्वेदाच्या अध्ययन करणाऱ्या एका ब्राह्मणाचे 'विशुद्धब्राह्मणगुणयुक्ता' सभ्रायिका नाम्नी सौभाग्यवतीपासून झालेल्या पुत्रास इन्दोकास श्री वनमालदेवाने मातापित्याच्या पुण्यानिमित्त त्रिस्रोता (तीस्ता) नदीच्या पश्चिमेस एक गाव दान दिले.'

"बभूव शाण्डिल्य कुलप्रदीपो वेदार्थविद् भिज्जटनामधेयः।
साङग यजुर्वेदमधीतवान् यस्त्यागी शुचिर्देवगुणोपपन्नः।।
शौचविप्रगुणोपेता पत्नी सभ्रायिकाभिधा।
ब्राह्मयेण विधिना सम्यक् परिणीता कुलोद्भवा।।
सुनुस्तयो र्वेदविदग्रजन्मा इन्दोकनामा गुणवान् वरिष्टः।
तस्मै ददौ श्री वनमालदेवो ग्रामं स मातापितृपुण्यहेतो :।।"

राजा बलवर्माने केवळ जमीनच ब्राह्मणास दिली येवढे नव्हे तर तीही मुक्त हस्ते. दक्षिण कुलातील द्विजिन्ना विषयान्तर्गत ४००० चतुसहस्त्र द्रोण धान ज्यातून उत्पन्न होईल एवढी जमीन, त्याने ऋतिधर नामक ब्राह्मणास स्नान करून दान दिली. कपिलगोत्रदीप तपस्वी पुण्यात्मा मालाधर भट्ट यांचा वैदिक धर्म अध्वर्यू पुत्र देवधर व त्याची सौभाग्यवती श्यामायिका यांचा हा ऋतिधर पुत्र होता. हे दान राजाने आपल्या कारकीर्दीच्या आठव्या वर्षात दिले.

## वैदिक चालीरीतींचाच पगडा

राजा बलवर्माचा पिता राजा जयमाल याने तसेच नंतर राजा ब्रह्मपाल यानेही योग्य वेळी राजसंन्यास घेतला ही घटना वैदिक धर्माला अनुसरून होती व आसामीय राजांवर वैदिक चालीरीतींचा किती दीर्घ पगडा होता याची आणखी एक प्रमाण देते.







वंशातील एकविसावा राजा त्यागसिंह निपुत्रिक वारला म्हणून त्याच्या प्रजेने 'भौमच' राजा असावा ह्या हेतूने नरकवंशीय ब्रह्मपालास इ. स. ९८५ मध्ये राजा निवडला.

'निर्वंशम् नृपम् एकविंशतितम् श्री त्यागसिंहामिधन्तेषाम् ।
वीक्ष्य दिवंगतम् पुतरह्ये भौमो हि नो युज्यते ॥

रत्नपाल ताम्रफलक.

## पालवंश

नरकवंशीय ब्रह्मपालाने स्वतःस महाराजाधिराज ही उपाधी घेतली होती. तो थंड स्वभावाचा होता व त्याच्या कारकीर्दीत कोणतीही विशेष घटना घडली नसावी नाहीतर नंतरच्या सापडलेल्या तीनचार ताम्रफलकात त्यासम्बन्धी उल्लेख सांपडला असता. चिरंजीव रत्नपाल राज्यभार धारण करण्यास योग्य होताक्षणीच ब्रह्मपालाने राजसंन्यास घेतला व गादीची सूत्रे रत्नपालाच्या हाती सोपवली. ह्या वंशाचे एकंदर आठ राजे होऊन गेले व त्यांची कारकीर्द १४० वर्षे म्हणजे इ. स. ११२५ पर्यंत टिकली.

ब्रह्मपाल
।
रत्नपाल
।
पुरंदरपाल
।
इंद्रपाल
।
गोपाल
।
हर्षपाल
।
धर्मपाल
।
जयपाल.

वडीलपैकी रत्नपाल, इन्द्रपाल व धर्मपाल ह्यांनी दिलेली प्रत्येकी दोन म्हणजे एकण सहा ताम्रपत्रके उपलब्ध आहेत. रत्नपालाची पत्रके त्याच्या कारकीर्दीच्या अनुक्रमे २५ व्या व २६ व्या वर्षात दिलेली आहेत. इन्द्रपालाने आठव्या वर्षात व एकविसाव्या वर्षात ही ताम्रपत्रके काढलीत. धर्मपालाच्या फक्त पहिल्या ताम्रपत्रकाचीच वेळ म्हणजे कारकीर्दीच्या तिसऱ्या वर्षात दिली. पण ह्याच धर्मपालाच्या दोन्ही पत्रकांमध्ये पालवंशावळ उद्धृत केली आहे त्यावरून वंशमालिकेसम्बन्धी पूर्ण उलगडा होतो. ह्या दोन्ही पत्रकांच्या आरम्भीच ब्रह्मपालाचा उगम नरक भगदत्तापासून वर्णिला आहे. रत्नपालाच्या प्रथम ताम्रफलकातील श्लोक इतिपूर्व नोंदलेच आहे. इंद्रपालाचे दोन्ही पत्रकात पालवंशाचा उगम नरक-भगदत्त-वज्रदत्तापासून दर्शविला आहे – श्लोक-८.

"भौमान्वयोन्नतिपदप्रथितप्रतिष्टः पथ्वीमजां विजयिनांधुरि वज्रदत्तः ।
दोर्वज्रवीर्यपरितोषित वज्रपाणिरासिदमुष्य मुषितारियशास्तनुजः ॥
अस्मिन्नेव नृपान्वये नरपतिः श्री ब्रह्मपालोभवत् ।

मगध देशीय वर्मनराजांच्या ताम्रपत्रकानुसार मगधराज जातवर्मन याने ब्रह्मपालाचा पराभव केला. ह्याच कारणास्तव बहुधा ब्रह्मपालाने राजसंन्यास घेतला असावा असा इतिहासकारांचा तर्क आहे. रत्नपालाने गादीवर आल्यावरोबर राजधानीच्या संरक्षणाकडे दृष्टिक्षेप केला व शहराचा त्याने कडेकोट वंदोवस्त करून राजधानीचे नव्याने 'श्री दुर्जया' असे नामाभिधान केले. ह्याची कारकीर्द एकूण तीस वर्षांची झाली व तो पराक्रमी म्हणून गाजला. 'परमेश्वर परमभट्टारक महाराजाधिराज' ही पदवी त्यास ब्रह्मवृंदानी चिकटवली व 'शत्रुघ्न' म्हणून त्याची कीर्ती गायली. पूर्वजांप्रमाणे तोही शास्त्री पंडीतांचा आश्रयदाता झाला. त्याची दोन ताम्रपत्रके – पहिले वडगांव येथील व दुसरे सोयालकुची येथील – उपलब्ध आहेत. पहिल्या ताम्रपत्रकान्वये २००० द्रोण धान्योत्पादन होईल एवढी जमीन राजाने शास्त्रविद्येतील अग्रगण्य व धर्मनिष्ठ ब्राह्मण वीरदत्त यांस विष्णुपदी संक्रांतीच्या दिवशी दान केली. ह्या वीरदत्त वाजसनेयी (यजुर्वेदीय) काण्वशाखेचा पराशर गोत्रीय होता. पत्रकाप्रमाणे तो शास्त्रज्ञगणाग्रणी व तीक्ष्णवुद्धी होता. जमीन लौहित्यनदीच्या उत्तरकुलात त्रयोदशग्राम विषयातील लावूकुटी क्षेत्रात होती. दुसऱ्या ताम्रपत्रकाप्रमाणे ३००० द्रोण धान्योत्पत्ती होईल एवढी जमीन कलंग विषयात भारद्वाज गोत्रोत्पन्न काण्वशाखीय वाजसनेयी भट्ट वलदेव ह्या विख्यात पंडीताचा पौत्र कामदेव यांस दिली गेली.

## ताम्रपत्रांवरून स्पष्ट होणारी माहिती

रत्नपालाचा पुत्र पुरंदरपाल अकाली वारल्याने त्याचा पुत्र इंद्रपाल राजा झाला. तो पण विद्वत्तेचा पाठीराखा होता. इंद्रपालाच्याही दोन ताम्रपत्रिका उपलब्ध आहेत. ज्याअर्थी दुसरी पत्रिका कारकीर्दीच्या २१ व्या वर्षी दिली गेली त्याअर्थी असे मानण्यास प्रत्यवाय नाही की त्यानेही पितामहाप्रमाणे अनेक वर्षे राज्य केले. पहिल्या पत्रिकेद्वारा हप्योप विषयातील ४००० द्रोण धान्य उत्पत्ती होईल एवढी जमीन यजुर्वेदीय काश्यप गोत्रीय देशपाल ब्राह्मणास दिली गेली. दुसरीप्रमाणे ब्रह्मपुत्रेच्या उत्तर किनारी मन्दी विषयात २००० धान्योत्पत्ती होईल एवढी जमीन वैनामक गावच्या यजुर्वेदी काण्वशाखीय सोमदेव ब्राह्मणास दान दिली गेली.

रत्नपाल व इंद्रपाल हे दोघेही ११ व्या शतकात राज्य करून गेले. इंद्रपालानंतर पुत्र गोपाल व नातू हर्षपाल हे गादीवर आले. पैकी हर्षपालाची कारकीर्द धामधुमीची झाली. बिल्हणाच्या 'विक्रमांक चरितात' चालुक्यराज विक्रमांक याच्याशी हर्षपालाचे युद्ध झाले असे विदीत आहे. हर्षपाल व राणी रत्ना यांचा पुत्र धर्मपाल हा गादीवर आला व १२ शतकापर्यंत राज्य करता झाला. त्याच्याही








दोन ताम्रपत्रिका उपलब्ध आहेत. पहिल्या पत्रकाद्वारा साग्वेदज्ञ शांडिल्य गोत्रीय ब्राह्मण रामदेव याच्या दोघा पौत्रांना द्विजिन्ना विषयातील ओविंदाप व कांजियामिटी अशा अनुक्रमे ४००० द्रोण व २००० द्रोण धान्योपादन करणाऱ्या जमीनी दान दिल्या गेल्या. दुसऱ्या ताम्रपत्रकात पूरजि विषयातील गुहेश्वर डिगडोल गावातील १०००० द्रोण (दशसहस्त्र द्रोण धान्योत्पत्ती) जमीन स्यातिपती गावच्या यजुर्वेदीय माध्यंदिन शाखेच्या शुद्धमौद्गल गोत्रीय मधुसूदन भट्टास दान दिली. उक्त दोन्ही ताम्रपत्रकातील ब्रह्मवृंदाचे व त्यांच्या सहधर्मचारिणींचे वर्णन फारच काव्यमय आहे. वरीलपैकी एका सनदेत धर्मत्याग करू नये असा उपदेश केला आहे. ह्या विशेष उल्लेखावरून असे अंदाजिले गेले आहे की धर्मपालाच्या कारकीर्दीत कामरूपमध्ये तांत्रिक बुद्धधर्माचा प्रचारारंभ झाला.

धर्मपालानंतर जयपाल गादीवर आला. गौडाधिपती रामपाल याने इ. स. ११२५ मध्ये कामरूपवर स्वारी करून जयपालाचा पराभव केला. येथेच नरकासूर वंशाचा अखेर अस्त झाला.

उपलब्ध ताम्रपत्रके व शिलालेखांवरून हे सिद्ध होते की बुद्धाचा व बुद्धधर्माचा जन्म शेजारील राज्यात होऊनही आसाम म्हणजे कामरूपवर त्याचा प्रभाव पडला नाही. ह्या विधानास युवानच्वँगची साक्ष आहे. राजा भास्करवर्मन सम्राट हर्षवर्धनाचा परममित्र तरी सुद्धा कनौजच्या महान धार्मिक बैठकीत भास्कराची वैदिक धर्मावरील श्रद्धा अबाधित राहिली. सर्वच वर्मन राजे शैवपंथी राहिले व क्षात्रधर्मास अनुसरून ते ब्राह्मणांचे पुरस्कर्ते व त्राते राहिले. त्यांचे अभय वर्तमान राहिले. अनेक मंदीरे त्यांनी स्थापन केली व वेळोवेळी यज्ञही आरंभिले. ब्राह्मणधर्माचा प्रचार कामरूपात इतका होता की शंकराचार्यसुद्धा इ. स. च्या ९ व्या शतकात कामरूपास भेट देते झाले. त्यांच्या आधी आठव्या शतकातील कुमारिल भट्ट हा ब्राह्मण कामरूपच्या इतिहासात सुप्रसिद्ध आहे. भास्करवर्माच्या निधानपूर ताम्रपत्रकात त्याचा जो स्वाभिमान गौरवपूर्वक उल्लेख आहे तो असा: 'कलितिमिर संचयतयाप्रकाशितार्य धर्मालोक:', 'कलियुगपराक्रमाकलितविग्रहस्य समुच्छवास इव भगवतो धर्मस्य नयस्याधिष्ठानमास्पदं गुणानां निधि:" – अनेक आसामीय राजांनी शिवमंदीरे बांधली व यज्ञही केले. भूतिवर्मन भास्करवर्मन, वनमाल, बलवर्मा, रत्नपाल, इन्द्रपाल, धर्मपाल ह्या राजांनी मुक्त हस्ते भूमिदाने दिली ते इतिपूर्व सविस्तर वर्णिलेच आहे.

विष्णुपुत्र नरकासुराच्या उपर्युक्त वंशजांद्वारा इसवीसनांच्या ४ थ्या शतकापासून ते बाराव्या शतकारंभापर्यंत आर्यधर्मविस्तार कसा झाला त्याचा हा विमर्श झाला. कामरूपच्या सीमेपासून जवळच भगवान बुद्ध जन्मला व त्यानेही जवळच्याच मुलुखात धर्मप्रचार व प्रसार आरंभिला तरीही कुसीनगरी त्याच्या निर्वाणानंतर प्राय: १५०० वर्षे नरकवंशीय राजे बुद्धधर्मापासून अलिप्त राहिले येवढेच नव्हे तर आर्यधर्माचा व शैवपंथाचाच त्यांनी पुरस्कार केला. भास्करवर्मनला दिलेल्या 'प्रकाशित आर्य धर्मालोक" ह्या संज्ञेचा अर्थ असाच लावावा लागेल की तद्देशीय आर्येतर अर्थात् मांगोलियन जमातींना त्याने आर्यधर्माची दीक्षा दिली. वर्मन राजांप्रमाणेच शालस्तम्भवंशीय व पालवंशीय राजे कर्मठ म्हणावे लागतील कारण त्यांनी शेकडो देवळे बांधली व मुक्त हस्ते जमिनी दान करून ब्राह्मणांना आपलेसे केले. एवढेच नव्हे तर यज्ञ करून होणाऱ्या धूराने गगन धूसरही केले.

## नरकासुराला आसूर म्हणणे अयोग्य

अशा ह्या आर्यधर्म प्रचारक आर्येतर जमातींच्या राजांचा आर्यांनी द्वेष कां करावा? त्यांची 'आसूर' म्हणून गौणत्वी गणना करावी कां? आपल्या देशातील वैदिक-अवैदिक अशा झगडयाचा हा कोणता प्रकार मानावा? जैन-बौद्ध हेही अवैदिक होते. नरकासूर व त्याचे वंशज आर्यधर्माचे पुरस्कर्ते राहिले. मग त्यांच्या विरुद्ध द्वेशाचे बीज कां रोवले गेले? या संदर्भात नरकचतुर्दशीचा जो नरकवधाशी संबंध जोडला गेला आहे तो आणखीनच गोंधळात टाकणारा आहे. बहुधा ह्यातील नरक हा नरकासुराशी संबद्ध नसून नर्क म्हणजे Hell शी जोडलेला असावा पण पुराणकालीन कथांनी केवळ प्रबळ आर्येतर म्हणून नरकासुराला त्यात ओडलेले दिसते. आणखी एक विचार या संदर्भात अधिक तार्किक वाटतो. तो असा की नरकासूर हा विष्णूचा भूमीपासून झालेला पुत्र जनकराजाने त्याचे पालनपोषण केले. पण त्याचे सात्मीकरण झाले नाही. म्हणजे देवपुत्र असूनही, अनौरस समजल्याने तेथे परका – दानवात देवांचा म्हणून दूरचा. त्याच्या मानसिक कोंडमाऱ्याने त्याच्या कर्तृत्वशाली आयुष्यात कामाख्यादेवीच्या संदर्भात त्याला विचलित केले असे म्हटल्यास ते फारसे अति आधुनिक ठरू नये. शिवाय त्याच्या आक्रमक व अग्रेसर भूमिकेचेही ह्यात थोड्या अंशाने स्पष्टीकरण नाही का सापडत?

• • •








अनुक्रमणिका



# अशी कशी घरात झाली बाई चोरी!

'जठार पेठेत दिवसाढवळ्या चोरी', 'ट्रंक फोडून अकराशे रुपये लांबविले', 'शहरात चोरांचा सुळसुळाट', 'चोरट्यांनी हजार रुपयांचा ऐवज पळवला' अशा मथळ्याच्या बातम्या दर दिवसाआड दैनिक 'डंका'त झळकत होत्या. चोऱ्यांचे सत्र जोरात होते. पोलिसखाते या पेठेतून त्या पेठेत आणि त्या पेठेतून या पेठेत चोरांचा पाठलाग करीत नुसते हिंडत होते. ज्या दिवशी चोरीची बातमी नसेल त्यादिवशी 'डंका'चे संपादक 'पोलिस झोपा काढीत आहेत काय?', 'पोलिसखात्याची अक्षम्य दिरंगाई', 'चोरांची धमाल आणि पोलिसांची कमाल' असे अग्रलेख छापून पोलिसखात्याच्या नावाने शंख करीत होते; कारण अजून कुणालाच अटक झालेली नव्हती अगर मुद्देमालही सापडला नव्हता. पुढे पुढे तर चोऱ्यांचे प्रमाण इतके वाढले की रिपोर्टस् फाईल करता करता पोलिसांच्या नाकी नऊ आले. त्यांचा सगळा वेळ रिपोर्टस् लिहून घेणे व पंचनामा करणे या पोलिशी कारवाईत जाऊ लागला आणि खुद्द चोरीचा तपास करण्यासाठी वेळ मिळेनासा झाला. त्यामुळे चोर देखील मलतेच शिरजोर झालेले होते.

एव्हाना ते जगज्जेत्या सिकंदराच्या थाटात अंबिकानगर, आळशी प्लॉट्स्, सिव्हील लाईन्स, राजेन्द्र कॉलनी, श्रीकृष्ण पेठ — असा एक एक टापू पादाक्रान्त करीत सुदामनगरीच्या आसपास येऊन थडकले होते. आणि त्यामुळेच सुदामनगरीत वातावरण भयभीत होते. 'नित्यानंद हाऊसिंग सोसायटी'तील घरे घरफोडीला तोंड द्यायच्या प्रसंगाने चिंतित झाली होती. जो तो सस्पेन्समध्ये होता. प्रत्येकजण 'आज आपल्याच घरी चोरी होणार' या अपेक्षेतच झोपत होता. झोपत कसला होता म्हणा! कारण बहुतेकांचा तर चोरीच्या धाकाने डोळ्याला डोळादेखील लागत नव्हता. त्यातल्या त्यात तात्या गोडबोले यांची अवस्था चमत्कारिक होती. कां कोण जाणे, पण सुदामनगरीत चोरी झालीच तर अख्खी सुदामनगरी वगळून ती त्यांच्याच घरी होणार अशी त्यांची खात्री होती. वास्तविक तात्यांजवळ काही मोठं डबोलं होतं अशातला भाग नव्हता. पंचवीस वर्षापूर्वी पी. डब्ल्यू. डी.त कारकन म्हणून शिरलेल्या व सहा महिन्यापूर्वी सस्पेण्ड

**किशोर मोरे**

होऊन बाहेर पडलेल्या इसमाजवळ असे कितीसे घबाड असणार? नित्यानंद सोसायटीत एक घर, चार-पाच तोळे सोनं आणि पाचशे रुपये 'हार्ड कॅश' ही तात्यांची, ते कम्पलसरी रिटायर्ड होण्यापूर्वीची (वर) कमाई! चोराला चोरीचा मोह होईल अशी आणखी कितीतरी घरे कॉलनीत होती. तरी पण चोरांची धाड आपल्याच घरावर येणार असा त्यांना आत्मविश्वास होता. त्यातून त्यांचा एकुलता एक मुलगा आठ दिवसापासून बायकोला घेऊन उन्हाळ्याच्या सुटीत सासऱ्याकडे पाहुणचार झोडायला गेला असल्यामुळे तात्या घरी एकटेच होते. त्यांच्या मते ही घरफोडीसाठी अगदी 'आयडियल सिच्युएशन' होती. म्हणून तात्यांनी परवा कॉलनीतील रहिवाशांची एक सभा तडकाफडकी घेऊन टाकली.

"बंधूनो,

आज आपल्या कॉलनीवर अनवस्था प्रसंग ओढवला आहे (...'अजून नाही—' एक आवाज) — माझ्या म्हणण्याचा अर्थ— ओढवणार आहे. आपण सर्व चोरांच्या आक्रमणाच्या छायेत वावरत आहो. गेल्या काही दिवसांपासून (आणि रात्रींपासून) चोरांनी



अनुक्रमणिका

आपल्या शहरात धुमाकूळ घातला आहे व आज उद्याकडे ते सुदामनगरीत येणार असल्याची दाट वदंता आहे. परिस्थिती आणीबाणीची आहे. मुख्य म्हणजे पोलिसांनी देखील चोरांपुढे हात टेकले आहेत. त्यामुळे सर्वप्रथम मला पोलिसांच्या निष्क्रीयतेबद्दल निषेधाचा ठरोव मांडायचा आहे. ही सभा त्याला मंजुरी देईल अशी अपेक्षा करून मी हा ठराव वाचून दाखवतो. ('नको नको'; 'ठराव मंजूर'; 'मुद्याचे बोला' इ. गिल्ला) – ठीक आहे – पाचामुखी परमेश्वर ! . . . . तर या बाबतीत आपल्यालाच काहीतरी करणे भाग आहे. 'प्रिव्हेन्शन इज बेटर दॅन क्युअर' असं कुणीसं म्हटलंय तेच मी पुन्हा म्हणतो. ('पेन्शन इज बेटर दॅन सस्पेन्शन नाही का ? – चोर लेकाचा' – एक दबलेला आवाज.) 'रात्र वैऱ्याची आहे'– किंवा खरं सांगायचं तर रात्र चोरांची आहे. म्हणून इथे जमलेल्या तरुणांनी उत्स्फूर्तपणे स्वयंसेवक म्हणून माझ्याजवळ नावे नोंदवावी असे मी त्यांना आवाहन करीत आहे. माझी सगळी भिस्त या तरुणांवरच आहे. हे स्वयंसेवक गटा-गटाने रात्री गस्त घालतील व हे आक्रमण थोपवून धरतील. त्यांना मार्गदर्शन करायला अनायासे मीही मोकळाच आहे. (हशा) या तरुणांचे हात बळकट करण्यासाठी सर्वांनी निधी गोळा करावा. ('निधी कशासाठी ?'– एक निषेधात्मक कोरस आवाज) 'तुमच्यासाठी रात्र जागवणाऱ्या या तरुणांच्या चहापाण्याचीही सोय आपण करू नये काय ?' असा खडा सवाल टाकून तात्यांनी सर्वांची तोंडे बंद केली. चहापाण्याचा उल्लेख निघताच दहा-बारा उत्साही तरुण पुढे आले. घरटी एक-एक रुपया वर्गणी देण्याची सूचना मंजूर झाली. तात्यांनी कोषाध्यक्ष म्हणून काम पाहण्याची तयारी दर्शविली होती, पण या सूचनेला कडाडून विरोध झाला. शेवटी स्टेट बॅन्केत अकाऊंटंट असलेले श्री. धर्माधिकारी यांनी ती जबाबदारी स्वीकारावी असे सर्वानुमते ठरले व सभा पांगली.

तात्यांच्या स्कीमला कॉलनीचा पाठिंबा मिळाल्यामुळे ते 'सिकारा'वर असल्या-

**. . . . 'पेन्शन इज बेटर दॅन सस्पेन्शन' कुणीतरी शेरा मारला, पण तात्या गोडबोले यांनी तिकडे लक्षच दिलं नाही ते म्हणाले, 'रात्र चोरांची आहे'**

सारखे उत्साहित दिसू लागले. पाच-सहा पोरं हाताशी धरून व त्यांना घरोघरी पिटाळून आधी वर्गणी गोळा करण्यात आली. टॉर्चेस्, शिट्या, लाठ्या इ. सामुग्री जमविण्यात आली. स्वयंसेवकांची चार पथकात विभागणी करून त्यांची गस्त घालण्याच्या कामगिरीवर नेमणूक करण्यात आली. प्रत्येकाला चहापाण्यासाठी रोज तीस पैशाचा भत्ता द्यावा असे ठरले. इतके करूनही तात्या निर्धास्त झालेले नव्हते. स्वतःच्या घरासाठी काहीतरी वेगळा बंदोबस्त करणे त्यांना आवश्यक वाटू लागले. दोन-तीन दिवसांपासून त्यांनी डिटेक्टिव्ह स्टोरीज् देखील वाचायला सुरवात केलेली होती. त्यामुळे फिंगरप्रिण्ट्स घेण्याची व्यवस्था करण्यापासून ते खिडकीच्या गजातून करंट खेळवण्यापर्यंत अनेक कल्पना त्यांच्या डोक्यात थैमान घालत होत्या. पैकी फिंगरप्रिण्ट्स्ची कल्पना त्यांच्या मनावर तितकीशी ठसली नाही कारण प्रत्यक्ष चोरी झाल्याशिवाय तिचा उपयोग नव्हता आणि तात्यांचा सगळा थर प्रतिबंधक योजनेवर होता. गजातून वीज खेळवण्याची कल्पना मात्र त्यांनी हाताळून पाहिली, पण इलेक्ट्रिक फिटींग करताना, त्यांनी स्वतःच शॉक खाल्ल्यामुळे त्यांचा विचार बदलला. शेवटी खिडकीजवळ बाहेरच्या बाजूला असलेल्या दिव्याखाली 'धोका २५० व्होल्टेज' ही अक्षरे रंगविलेली आणि 'मानवी कवटी आणि एकमेकाला छेद देणारी दोन हाडे' यांचे चिन्ह काढलेली एक पाटी त्यांनी टांगून ठेवली. त्या बल्बला लाल रंग द्यायलाही ते विसरले नाही. खिडकीची नाकेबंदी झाल्यावर दरवाजा फोडून येणारासाठीही त्यांनी बंदोबस्त केला. समोरच्याच भिंतीवर कुणाचीही नजर पडावी अशा बेताने एक उग्र चेहऱ्याचा व भरघोस मिशा असलेल्या पोलिसाचा फोटो त्यांनी लावून ठेवला. हेतू हा की चोराची आपण एखाद्या पोलिसाच्याच घरात शिरतो आहोत अशी दिशाभूल व्हावी व तो आल्यापावली परतावा. पैशाचे पाकीटही त्यांनी त्याच फोटोच्या आड दडवून ठेवले. दागिन्याचा डबा तुरीच्या डाळीत दडवला. एकंदरीत तात्यांनी आपल्याकडून जय्यत तयारी करून ठेवली होती.

रात्रीचे अकरा वाजले होते. उन्हाळ्याचे दिवस असल्यामुळे सुदामनगरी आपली घरे गोदरेज, क्लिक आणि नवतालच्या स्वाधीन करून आऊटडोअरला खाटा-पलंगावर आडवी झालेली होती. दोन-तीन दिवस उत्साहाने गस्त घालूनही काहीच निष्पन्न न झाल्यामुळे स्वयंसेवक मंडळी भत्त्याच्या पैशाचा सदुपयोग करण्यासाठी 'हम सब चोर हैं' या कन्सेशन रेटमधील सिनेमाला जाऊन बसलेली होती. सगळीकडे सामसूम होती. मध्येच एखादे कुत्रे भुंकत होते आणि इतर कुत्री त्याला साथ देऊन त्याचा संदेश गल्लीभर पोहोचवीत होती. तात्यांनी नुकतीच 'चाणाक्षपणाचा कळस' ही रहस्यकथा वाचून संपविली होती व कुलूप पक्के लागले असल्याची खात्री करून घेऊन आणि किल्ली उशाशी आहे की नाही हे चाचपून ते देखील झोपी जाण्याच्या तयारीत होते. त्यांनी डोक्यावरून चादर घेतली, इतक्यात त्यांच्या कानावर 'करंरं ऽ, करं ऽ, करंरं, करं ऽ' असा ध्वनी आला. तात्यांनी चादरीतल्या चादरीतच कानोसा घेतला. कुणाच्यी तरी बुटांचा आवाज होता. तो आवाज तात्यांच्या घरासमोरून पुढे सरकला, किंचित थबकला आणि पुन्हा मागे आला. तात्यांनी हळूच पांघरुणातून डोके बाहेर काढले व डोळे किलकिले केले. पांढऱ्या कपड्यातील एक आकृती आजुबाजूच्या घरांचे निरीक्षण करीत होती. क्षणभर थांबून ती आकृती पुढे गेली व डावीकडे वळली. ती दिसेनाशी झाल्यावर तात्या बटण दाबल्यासारखे अंथरुणातून ताडकन् बाहेर पडले. त्या अज्ञात








इसमाच्या संशयास्पद हालचाली पाहून तो नक्की चोरच असल्याची तात्यांची खात्री झाली. त्यानंतर मात्र तात्यांच्याच हालचाली चोरासारख्या होऊ लागल्या. त्यांनी हळूच उशीखालचा टॉर्च घेतला, काठी उचलली व ते दबकत दबकत शेजारच्या फाटकांकडे गेले. त्यांना तयार राहायला सांगून ते इतर शेजाऱ्यांकडे वळले. आधी त्यांनी वानखेडे मास्तरांना झोपेतून उठवले. वानखेडे मास्तर ः र तात्यांना पाहूनच 'चोऽर चोऽर' म्हणून ओरडणार होते, पण भीतीने त्यांच्या तोंडून आवाजच निघेना. त्यांनी ओरडण्यासाठी नुसते तोंड उघडले व तात्यांनी चपळाईने त्यांच्या तोंडावर हात ठेवून त्यांना स्वतःची ओळख दिली आणि त्यांना अंथरुणातून बाहेर काढले. पाच मिनिटाच्या अवधीत तात्यांनी सगळ्यांना वर्दी दिली. सगळेजण लाठ्या घेवून तात्यांच्या घरी जमले आणि तात्यांच्या नेतृत्वाखाली मोर्चा निघाला. एकटे तात्या सोडले तर बाकीची मंडळी झोपेत चालत असल्यासारखी चोराच्या मागोव्यावर निघाली होती. संशयित इसम ज्या गल्लीत वळला होता त्या गल्लीतून तात्यांनी मोर्चा नेला. गल्लीच्या तोंडावर त्यांनी सगळ्यांना 'सावधान'चा इशारा दिला व इथून पुढे इकडे तिकडे कानोसा घेत मांजराच्या पावलांनी ही सेना निघाली. पण आठ-दहा घरे टाकूनही चोराचा कुठे मागमूसही दिसेना. मग तात्यांनी सेनेची तीन तुकड्यात विभागणी केली. एक तुकडी उजवीकडे, एक डावीकडे व एक समोरच्या दिशेला पाठवली व स्वतः एका जागी विडी फुंकत उभे राहिले. "तात्या ऽ, –अहो तात्या" उजवीकडून चोरट्या आवाजात फाटकांनी तात्यांना साद दिली. तात्यांनी लगेच विडी खाली टाकली, ती टाचेखाली चिरडली व ते तुरुतुरु निघाले.

"काय म्हणता ? – लागला का काही सुगावा ?"

"कुळकर्णींच्या घरात दिवा दिसतो आहे. ही सगळी मंडळी वरच्या गच्चीवर झोपलेली असणार. चोरांनी नेमकी संधी साधलेली दिसत्येय. पक्का संधिसाधू दिसतोय."

"फाटऽक, प्रसंग कोणचा आहे अन् तुम्हाला विनोद सुचतोय–"तात्यांनी फाटकांना फटकारले."–आपण मुळीच वेळ घालवता कामा नये.–ए अनंता, तू ताबडतोब पोलिस घेऊन ये बघू – असाल तसे या म्हणावं आणि हातकड्याही आणायला सांग–पळ लवकर. हं, फाटक, तुम्ही इतर मंडळींना घेऊन या. कुळकर्णींच्या घराला घेरा द्यावा लागेल. त्याला लेकाला चोरीबिरी करून घेऊ द्या. त्याची चोरी आटोपल्यावर आपण त्याला रेडहॅण्डेड पकडायचा –आऽगदी मुद्देमालासकट ! तोपर्यंत पोलिसही येतीलच. द क्रेडिट शुड गो टू सुदामनगरी ! हरी अप !"

तात्यांच्या सूचनेप्रमाणे फाटकांनी इतर गल्लीबोळांतून चोराचा तपास करीत असलेल्या तुकड्यांची जमवाजमव केली. सगळी फौज जमल्यावर तात्यांनी कुळकर्णींच्या घराकडे कूच केले. तात्यांनी घराला वेढा घालण्याचा हुकूम दिला. सगळेजण अंधारात दबा धरून बसले. पाच-दहा मिनिटे अशीच गेली. प्रत्येकाची उत्सुकता ताणली गेली. फौजेत चुळबुळ सुरू झाली. चोरावर हमला करण्यासाठी प्रत्येक जण अधीर झाला होता. तात्या मात्र सर्वांना 'लेट् हिम टेक हिज ओन टाइम' असे सांगून आवरत होते. आपल्या परिश्रमाचे चीज झाल्यामुळे व आज जो तो त्यांच्या हुकूमाचे पालन करीत असल्यामुळे तात्यांना विलक्षण धन्यता वाटू लागली होती. पेपरात नाव छापून आल्याचे व चोराला पकडण्याचे सगळे श्रेय आपल्यालाच मिळाल्याचे स्वप्न ते उघड्या डोळ्यांनी पाहू लागले. इतक्यात कुठेतरी कडी काढल्याचा आवाज झाला. तात्यांनी फौजेला 'ऑनगार्ड'चा इशारा दिला. मागच्या दरवाज्यातून एक आकृती बाहेर पडली व घाईघाईने बाथरूममध्ये शिरली.

"तोच तो – बाथरूममध्ये शिरलाय"– तात्या उत्तेजित स्वरात म्हणाले.

"फाटक, चला लवकर. मघाचाच इसम आहे तो – मी बरोबर ओळखलंय. – तो बाहेर पडायच्या आत कडी लावून टाकली पाहिजे."

दोन-चार जण धावण्याच्या शर्यतीत भाग घेतल्यासारखे पळाले व कडी लावून विजयी मुद्रेने परतले.

"आता कुळकर्णींना उठवायला हरकत नाही. गृहस्थाच्या स्वप्नातही नसेल त्यांच्या घरात काय प्रकार चालू आहेत !"

कुळकर्णींना उठवायचं म्हटल्यावर दोघंतिघं बेंबीच्या देठापासून ओरडू लागले.

"कुळकर्णी ऽ –"

"चो ऽ र–"

"अहो, कुळकर्णी–"

"चोऽर, चोर –"

कुळकर्णींना हाका मारता मारताच काही जणांनी चोर आल्याची वर्दी त्यांच्या कानावर टाकण्याचे मनावर घेतल्यामुळे वातावरणात 'कुळकर्णी–चोर, कुळकर्णी–चोर' असे आवाज उमटू लागले. आज ऑफिसात हात ओला केल्याचे कुणाला कळले की काय असा मनाशी विचार करीत कुळकर्णींनी तिसऱ्याच हाकेला दार उघडले. कुळकर्णी गच्चीवरून येतील अशी साऱ्यांची कल्पना ! पण ते चक्क समोरचं दार उघडून प्रकट झाल्यामुळे पब्लिकचा आवाज तोंडातल्या तोंडातच विरला. तात्या आणि कंपनी भुताटकीचा प्रकार पाहिल्यासारखी अवाक् झाली.

"ही काय भानगड आहे ? काहो कुळकर्णी, तुमच्या घरातून तुम्ही कसे काय बाहेर पडलात ? –" फाटकांनी उलट कुळकर्णीलाच विचारले.

"म्हणजे ? – माझ्या घरातून मी नाही बाहेर पडणार तर आणखी कोण ?"

"तसं नव्हे हो – पण तुमच्या घरात चोर घुसला होता ना !"

"चोऽर ? – कुठाय चोर ?" कुळकर्णींनी पृच्छा केली.

"त्याला आम्ही बंद केलाय –" असं म्हणून तात्यांनी बाथरूमकडे बोट दाखवले. इतक्यात बाथरूममधूनच धडधड आवाज येऊ लागले. धर्माधिकारींनी लगबगीने कडी काढली व बाथरूममधून बाहेर पडणाऱ्या गृहस्थावर झडप घालण्याच्या पवित्र्यात ते उभे राहिले. इकडे कुळकर्णी मात्र हर्षवायू झाल्यासारखे खोः खोः हसू लागले. तात्यांच्या लक्षात हे गौडबंगाल येईना. ते एकवेळ कुळकर्णीकडे आणि एकवेळ त्या संशयित इसमाकडे पाहून वेड्यासारखे हातवारे करू लागले. त्या गृहस्थालाही मध्यरात्रीच्या वेळी या पब्लिकचा काय कार्यक्रम चालू आहे याचा अंदाज येईना. भग हास्याची उबळ ओसरल्यावर कुळकर्णींनीच खुलासा केला –

"तात्या, तुम्ही अगदी कमालच केलीत आज ! अहो हे माझे चुलत सासरे आहेत – वाघमारे – चन्द्रपूरला असतात. आजच आले – आणि हे तात्या गोडबोले, हे फाटक, .... वानखेडे मास्तर, हे धर्माधिकारी..." कुळकर्णींनी लगेच पाहुण्यांची सगळ्यांशी ओळखदेखील करून दिली. तात्यांचा चेहरा फोटो काढण्यालायक झाला होता. डोंगर पोखरून उंदीर निघाल्यामुळे त्यांची हवाच गेली होती.

"माफ करा हं, वाघमारे ! मघाशी तुम्हाला एक दोनदा माझ्या घरासमोरून फेऱ्या घालताना पाहिलं. मग तुम्ही आजुबाजूच्या घरांकडे नजर टाकली व इकडे वळलात. तुमच्या हालचाली पाहून आमचा गैरसमज झाला. कुळकर्णी, प्लीज् एक्स्क्यूज अस् !"

–"एक्स्क्यूज अस् का ? तात्या, एक्स्क्यूज मी म्हणा ! कुळकर्णी, हा सगळा उपद्व्याप तात्यांचाच आहे. आम्ही तर ढाराढूर झोपलो होतो. हे तात्याच आले 'चोर आला रे आला' करत–" आता सगळेच तात्यांवर उलटले. त्यांची सामुदायिक 'क्रॉस एक्झामिनेशन' सुरू झाली.

"तात्या, आज तुम्ही चोर सोडून संन्याशालाच धरणार होता !"

"अहो, पण –"

"अहो पण काय ? मी म्हणतो तुम्हाला एवढ्या जंटलमन माणसाचा संशय आलाच कसा ?"

"एक्झॅक्टली ! अगदी सरसे पावतक मला आदमी आहे विचारा ! !"

–"कुळकर्णींचा सासरा चोर ? हॅं – काहीतरीच !" वानखेडे मास्तरांनाही कंठ फुटला.

"वानखेडे गुरुजी, असं काय करता–" तात्या अजीजीने म्हणाले, "मी तुम्हाला उठवायला आलो तेव्हा तुम्हाला नव्हता का माझा संशय आला ?"

–"तुमचा आला ते ठीक आहे !"

"जाऊ द्या हो ! –" शेवटी पाहुणाच मध्ये पडला, "इथे सारखी सारखी घरं असल्यामुळे मला लवकर घर सापडेना म्हणून मी शोधाशोध करीत होतो. तात्यांना संशय येणं साहजिक आहे. माझी लाईन चुकली नसती तर हा प्रकार घडलाच नसता."

पाहुण्याने तात्यांची बाजू घेऊन त्यांच्यावर होणारा चौफेर हल्ला थोपवून धरला. तात्यांना थोडे हायसे वाटले इतक्यात बुटांचा खाडखाड आवाज ऐकू आला. सगळ्यांनी माना वळवल्या. अनन्ता दोन पोलिस घेऊन आला होता.

–"ह्यापैकी चोर कोन ?" हवालदाराने मुद्याला हात घातला. दुसरा पोलिस हातकडी घालायच्या पोजमध्ये उभा होता.

"आम्हाला काही माहीत नाही. यांना विचारा." सगळेजण तात्यांकडे बोट दाखवून मोकळे झाले.

"कुछ नही हवालदार साब. असलमें चोर आये ही नही. ये तो हमारे पाहुणे है–" तात्या केविलवाण्या हिन्दीत पोलिसांना परिस्थिती समजावून सांगण्याचा प्रयत्न करून देऊ लागले. पण तात्यांना धड सांगता येत नव्हते आणि पोलिसांचा 'टयूबलाइट'

[पान ५३ वर पहा]

पॉप डान्स !



# गृहस्थ गाथा : ३ :

— ग. का. भडकमकर



## सौंदर्यविषयक प्रश्नोत्तरे

**माझ्या वयाच्या मानाने आणि शरीराच्या मानाने उंची फारच कमी आहे. काय करू ? कशा प्रकारचे कपडे वापरावेत ?**

तुम्ही पुरुष आहात तेव्हा उंचीसारख्या शुल्लक गोष्टीकडे लक्ष देऊ नका. कर्तृत्वाची उंची वाढवा. उंची आणि कर्तृत्व यांचा काहीही संबंध नाही. उंची कमी असल्यामुळे तुमचं लग्न होण्याच्या मार्गात अडचण येईल असं तुम्हाला वाटत असणं साहजिक आहे; पण लक्षात ठेवा. उंची उभं राहिल्यावर मोजतात (पुढचं सांगायलाच पाहिजे का ?). कमी उंचीच्या लोकांना खूप मुलं होतात असं दिसतं. लग्न झाल्यास नियोजन करा. आता कपड्यांबद्दल. कपडे वापरा. लेंगा, पँट वगैरे वापरल्यामुळे आपण उंच दिसू अशा कल्पनेनं मोंगळ कपडे वापरू नका. शक्यतो अर्ध्या चड्डीत राहा. सुटसुटीत वाटतं. संघिष्ट वाटाल. मुली चेष्टा करतील पण त्यांना तुमचीच गरज पडेल.

**माझी दाढी फार राठ आहे. मऊ होण्यासाठी काय करावे ?**

दाढी, वाढण्याच्या काळात, राठ वाटते. दाढी करूच नका. पूर्ण दाढी वाढल्यानंतर तिच्यावरून हात फिरवा आणि सांगा मऊ वाटते की नाही ? मात्र दाढी वाढल्यानंतरचा आणि दाढी नसल्याचा असे दोन फोटो सतत जवळ बाळगा. त्या रामन राघव प्रकरणापासून दाढीवाल्यांचं काही खरं नाही. सगळे दाढीवाले सारखेच दिसतात... दाढी न केल्यामुळे पैसे वाचतील. शिवाय रुबाबदार दिसाल. दाढी कापण्यामुळे अधिक जोरात वाढते व राठपणा वाढतो. तेव्हा वाढीस लागलेल्या दाढीला कात्री लावू नका. महिन्यादीडमहिन्याने नगरपालिकेत जाऊन दाढीत डी.डी.टी पावडरचा फवारा मारून घ्या.

**सुंदर दिसण्यासाठी मिशा राखणे कितपत योग्य व सफल ठरणारे असते ?**

सुन्दर दिसण्याचा प्रयत्न करू नका. पुरुष दिसण्याचा प्रयत्न करा. मिशांमुळे पौरुषत्व सिद्ध होतं. मिशा ठेवणं न ठेवणं हे तुमच्या नाकावर, ओठांवर व रंगावर अवलंबून आहे. आपले नाक व ओठ कसे आहेत ते, व आपला वर्ण, लिहून कळवा. वर्ण खराखुरा लिहा. गव्हाळी, सावळा अशी बायकांच्या बाबतीत खोटी खोटी वापरली जाणारी विशेषणं नकोत... मिशांमुळे कोणती सफलता तुम्हाला ठरवावयाची आहे ? आम्हाला वाटतं ते विरुद्ध पार्टीवर अवलंबून आहे. त्यांच्या आवडीनिवडीत आम्ही कां नाक खुपसायचं ? तुमचं तुम्ही पाहून घ्या.

**माझे दंड आणि संपूर्ण हात इतके जाड आहेत की अर्ध्या बाह्यांचा शर्ट घालून रस्त्याने जाताना बायकांकडून मला फारच टोमणे खावे लागतात.**

अहो चालायचंच ! हल्ली बायका फारच चोखंदळ झाल्या आहेत. पण तुम्ही कशाला घाबरता ? वास्तविक बायकांनीच तुम्हाला घाबरायचं ! तुम्हाला दंड व हात कमी करायचे असतील तर दंडबैठका सोडून द्या. व्यायाम-शाळेऐवजी मुलींच्या शाळेकडे वळा. शक्य झाल्यास प्रेमात पडा. आत्ता झुरणीला लागून शरीरानेच काय, मनानंही कमकुवत व्हाल. ध्यानात असू द्या. प्रेमात पडल्यानंतर टोमणे तर मिळतातच पण क्वचित् चप्पलही मिळते. प्रकरण चालू ठेवा. आपला मूर्खपणा कळून येण्यासाठी परमेश्वरानं तुम्हाला उदंड आयुष्य दिलं आहे.



अनुक्रमणिका

## ....'गृहस्थां'पुढील या नेहेमीच्याच समस्या ! तुमच्याही मनात यातले काही प्रश्न घोटाळत असतीलच; त्यावरील उपायही येथेच सापडतील

**माझ्या गालांवर व ओठावर अजिबात लव नाही. येण्यासाठी काय करावे ?**

पत्रावरच्या नावावरून तुमचा लिंगभेद स्पष्ट झाला नाही. कृपया, विजू कारखानीस म्हणजे तुम्ही विजय कारखानीस की विजया कारखानीस ते कळवा. हल्ली पाश्चात्य देशात स्त्रिया पुरुषांप्रमाणे दिसण्याचा प्रयत्न करतात. तसं तुम्हाला काही करायचं आहे का ? ज्याअर्थी तुम्ही महाराष्ट्रीय आहात व लव येण्याबाबत विचारलं आहे त्या अर्थी तुम्ही पुरुषच असला पाहिजेत असं आम्ही समजतो . . . लव याबीशी वाटते अशा ठिकाणांवरून वस्तरा फिरवा. उपाय सफळ झाला नाहीच तर ट्रॉम्बेचं सुफला खत रात्री चेहऱ्यावर चोपडून झोपा. परिणाम व्हावा असा अंदाज आहे. आम्हीदेखील अंदाजच व्यक्त करीत असतो. कारण खत सरकारी आहे. खात्री देणं कठीण आहे.

**मी तरुण पुरुष असून चेहरा अगदी गुळगुळीत आहे. थोडा खड-बडीत होण्यासाठी काय करू ?**

तुमच्या वयावरून, तुमच्या चेहऱ्यावर मुरुमाचे फोड असायला हवेत, परंतु ते तसे नाहीत. तुम्हाला तारुण्यसुलभ भावनाच नाहीत का ? राग मानू नका, पण आम्हाला तुमच्या पौरुषत्वाविषयी शंका येते. कृपया डॉक्टरांना भेटा. आम्ही सौंदर्यविषयक प्रश्नांना उत्तरं देत असतो. शरीरशास्त्रविषयक प्रश्नांना नाही.

**मी ९१ वर्षांचा असून प्रकृती चांगली असल्यामुळे सगळे जण मला 'लोद्या' म्हणतात.**

तुम्हाला ठेवलेल्या टोपणनावामुळे आम्हालाही हसू आलं. (हो. आम्ही हसू शकतो). कन्सोलेशन्स ! कशाला इतकी वर्षं जगलात ? तेही प्रकृती चांगली ठेवून ! लोक तुम्हाला म्हातारा म्हणण्यापेक्षा लोद्या म्हणतात याचं तुम्हाला फारच वाईट वाटतंय् असं दिसतं. या वयात पुन्हा लग्न करा. अर्थात् तरुण मुलीशी. ती तुम्हाला अशी काही सळो की पळो करून सोडील की, तुम्ही शंभरी स्वर्गातच साजरी कराल. आपल्या देशात तुम्हाला तरुण मुलगी, बायको म्हणून मिळणं कठीण आहे. परदेशी वृत्तपत्रात जाहिरात द्या. तिकडची मुलगी तुमची लवकर सुटका करील. प्रकृतीची चिंता आपोआप मिटेल.

**दागदागिने वापरल्याने सौंदर्य वाढते काय ?**

'गृहिणीगाथा'चा प्रश्न तुम्ही चुकून आमच्याकडे धाडलेला दिसतो. पुरुषांचं सौंदर्य त्यांच्या सामर्थ्यात असतं, असं आचार्य अत्रे म्हणतात. सामर्थ्य म्हणजे जोम. तो वाढवण्यासाठी हल्ली खूप प्रकारच्या गोळ्या मिळतात. त्या वापरा. दागदागिने कसले वापरता ?

**माझा चेहरा फारच काळा आहे. आणि काही वेळेस माझ्या या काळेपणाचा इतका उबग येतो की विचारायची सोय नाही.**

तुमच्या पत्राला येणाऱ्या दुधाच्या वासावरून तुम्ही सतत म्हशींच्या सहवासात असता असं दिसतं. म्हशींची संगत सोडा. त्यांचं दूध जरी पांढरं असलं तरी त्याचा तुमच्या वर्णावर काळा परिणाम होतोय्. पांढऱ्या गाईचं पांढरं दूध प्या. आणि तिच्या शेपटानं रोज चेहरा साफ करीत जा. काही दिवसांनी गोरे दिसायला लागाल. अतिगोरे दिसायला लागलात तर, वर सुचवलेलाच उपक्रम, पण उलटा, अनुसरा.

**मी विवाहित तरुण आहे. माझे पोट सुटल्यासारखे मोठे आहे. त्यामुळे माझ्या शरीराचा घाट अगदी बेडौल दिसतो.**

तुमचं लग्न झालेलं आहे. त्यामुळे स्वतःच्या शरीराच्या घाटा-पेक्षा तुमच्या बायकोला आवडणाऱ्या वांगड्यांच्या घाटाकडे लक्ष द्या. अविवाहित असता तर कदाचित् ढेरपोट्या म्हणून मुलींकडून नकार मिळण्याची शक्यता होती. पोट सुटण्यामुळे माणूस भारदस्त दिसतो. पोट कमी करण्यासाठी वातूळ पदार्थ वर्ज्य करा. (तुमची बायको वातप्रकृतीची आहे काय ?) बायकोला फळीवरचे डबे काढून देणे, मुलांच्या मागे पळणे, कमरेत वाकून बायकोच्या पाया पडणे इ. व्यायाम करा. पोटावर तासन् तास पाटावरवंटा ठेवून निजेणे हाही एक तोडगा आहे.

**चेहऱ्यावरचे पांढरे डांग कसे घालवावेत ?**

चेहऱ्यावर पांढरे डाग असणं हे थंडपणाचं लक्षण आहे. अंगातील ही थंडाई दूर करण्याकरिता लापशी, निन्वोणी, शेपूची भाजी इ. पदार्थांचा उपयोग करावा. नुसते काल्याचे पाणी घेतल्याने ही शरीरातली थंडाई दूर होण्यास मदत होते. या पांढऱ्या चट्यां-करिता वरून करावयाचा उपाय म्हणजे रात्री निजण्यापूर्वी करंजेल तेल, तांबडे तिखट किंवा / आणि लोणच्याचा खार चेहऱ्या-वर चोळावा.

**हाताच्या बोटाची नखे वाढविण्यात सौंदर्याचा भाग आहे का ?**

खरं म्हणजे नखं वाढवण्यात सौंदर्याचा भाग नसून चौर्याचा भाग आहे. पाकिटमार वगैरे मंडळी नखात पात्याचे तुकडे ठेवतात ही गोष्ट तुम्हाला माहीत असेलच. नखांचं सौंदर्यक्षेत्रातील स्थान गौण आहे. केवळ हौसेसाठी नखं वाढवणं अयोग्य आहे. नख ही सौंदर्य रक्षणासाठी (अर्थात्च दुसऱ्याच्या) वापरा. नखं वाढल्या-नंतर त्यांना ऑइलपेंट लावा. म्हणजे त्यांच्या भयानकतेची कल्पना येईल. शेतीच्या अवजारांना नवेपणी फक्त पुढच्या भागाला रंग असतो हे तुम्ही जाणताच.

**माझे कपाळ चेहऱ्याच्या मानाने बरेच रुंद आहे तर ते जरा अरुंद दिसण्यासाठी काय करावे ?**



अनुक्रमणिका






तुम्ही प्रश्न सरळ न विचारता तिरकस विचारला आहे. तुमचं कपाळ रुंद नसून ते टक्कल पडत चालल्यामुळे रुंद दिसत असावं व तुम्हाला केस न गळण्याबद्दल उपाययोजना हवी आहे असं आम्हाला वाटतं. बरोबर आहे ना? टक्कल पडत जाणं ही नैसर्गिक क्रिया आहे. त्यावर उपाय नाही. उगाचंच केशवर्धक तेलात पैसे खर्च करू नका. केशवर्धक तेलं हा धूर्तांचा तुमच्यासारख्यांना वनवण्याचा व्यापार आहे. ज्या दिवशी केशवर्धक तेलामुळे आम्ही दगडाला केस उगवलेले पाहू त्याच दिवशी केशवर्धक तेलाचा आम्ही पुरस्कार करू. केशवर्धक तेलाच्या जाहिरातीत आधी टक्कल पडल्याचा व नंतर केशवर्धन झाल्याचा असे फोटो देतात. [illegible]यांचा क्रम चुकीचा असतो असं आमचं ठाम मत आहे. टकलाचा एक फायदा असतो. डोक्यात खोक पडल्यास ती नक्की कुठे पडली आहे हे चटकन समजतं व औषधोपचार करता येतो. टक्कल पडत जाणे याचा अर्थ माया साठत जाणे असा आहे, पण तुमच्याजवळची माया मराठी नाटक किंवा चित्रपट यांना फायनान्स करून घालवू नका. आपला प्रेमळपणाचा सल्ला. तसं केलंत तर पिंजारायला डोक्यावरचे आहेत तेही केस शिल्लक राहायाचे नाहीत. टकलावर उत्तम उपाय म्हणजे टोप किंवा टोपी वापरणे.

**ढगळ कपडे वापरल्याने शरीरसौष्ठव खरोखरच उठावदार दिसते काय? माझी मापे प्रमाणबद्ध आहेत, तेव्हा मी ढगळ कपडे वापरावेत काय?**

तुमची मापे प्रमाणबद्ध आहेत म्हणजे नक्की कशी आहेत ते कळल्यास प्रश्नाचं उत्तर देणं सुलभ जाईल. मापंविपं हे प्रकरण फक्त बायकांच्याच बाबतीत असतं अशी आमची समजूत होती. पुरुषांनाही त्या गोष्टीची बाधा केव्हांपासून झाली? खरं म्हणजे आम्हाला मापं कळवण्यापेक्षा तुमच्या शिंप्याला ती तुम्ही व्यवस्थित दिलीत तर तो तुम्हाला चांगले अंगालगत कपडे शिवून देईल. बाजारात हल्ली एक नवीन प्रकारचं कापड आलं आहे. त्याचे कपडे शिवल्यानंतर आटत तर नाहीच पण ढगळ होत जातात.

**माझ्या भुवया फारच जाड आहेत. आणि डोळे लहान आहेत त्यामुळे विचित्र वाटते.**

आम्हाला काही विचित्र वाटत नाही. भुवयांच्या जागी भुवया आणि डोळ्यांच्या ठिकाणी डोळे आहेत ना? आता त्या किंवा ते कसे असावेत हा परमेश्वराच्या अखत्यारातला प्रश्न आहे. तुमच्या लहान म्हणजेच नाजुक डोळ्यांच्या संरक्षणासाठी जाड भुवयांची परमेश्वरानं योजना केली आहे. परमेश्वरी सत्तेपुढे आपला काय इलाज? डोळे मोठे दिसावेत म्हणून बहिर्गोल भिंगाचा चष्मा वापरा. मात्र चष्मा सारखा सारखा इतरांच्यादेखत काढू नका. तुमच्या डोळ्यांचे बिंग आणि चष्माचे भिंग दोन्हीही फुटतील.

**माझा वरचा ओठ प्रमाणापेक्षा मोठा आहे. तर तो लहान दिसण्यासाठी मी काय करावे?**

बहुतेक वेळा दात पुढे असल्यामुळे ओठ जाड वाटतात. सर्वसाधारण उपाय म्हणजे दात पाडून टाकणे. मोफत दांत पाडून घेण्यासाठी मुलींच्या मागे लागा. तोंडाचं बोळकं होऊन ओठ फारच पातळ वाटू लागल्यास कवळी बसवून घ्या. ही मात्र पैसे खर्च करूनच घ्यावी लागेल.

**अलिकडेच माझ्या डोळ्यांच्या भोवती काळी वर्तुळे दिसू लागली आहेत. ती कशामुळे आहेत आणि त्याला मी काय करावे?**

सशक्तपणामुळे आणि फार झोपाळूपणामुळे अशी वर्तुळे दिसतात. वर्तुळं घालवण्यासाठी शून्यात पाहात बसा किंवा जागरण, वाचन, लेखन, शिवण इ. गोष्टींवर भर द्या. शून्यात म्हणून म्हटल्या जाणाऱ्या चहाचा आपल्या आहारात समावेश करा. डोळ्यांना ताण जाणवत नसेल तर चहाच्या पट्ट्या सुमारे अर्धा तास डोळ्यांवर ठेवा.

**सत्तराव्या वर्षी माझे केस काळे होऊ लागले आहेत. प्रथम काहीच्या साहाय्याने मी ते काळे झालेले केस उपटून टाकीत असे. पण आता त्याचे प्रमाण वाढले आहे. याला इलाज काय आहे? तसेच चेहेऱ्यावर मुरुमाचे फोड दिसायला लागले आहेत त्यामुळे विद्रूप दिसतो.**

म्हातारपण म्हणजे दुसरं बालपण हे आम्हाला ठाऊक होतं पण तुमच्या बाबतीत दुसरं तारुण्य दिसतंय्. अभिनंदन! पण केस उपटून टाकणं हा निव्वळ वैताग आहे. डोक्यावरून स्नान करताना (करता ना?) नासक्या अंड्याचा वापर करा. परिणाम झाला नाहीच तर बाजारात मिळणारं कोणतंही सुवासिक तेल वापरा. अगदी खात्रीचा उपाय. दुसरं तारुण्य संपून दुसरं म्हातारपण सुरू झालं की मुरुमाचे फोड आपोआप जातील. सत्तराव्या वर्षी रुपाचं काय घेऊन बसला आहात? अजून जिवंत आहात हे काय कमी आहे?

**सिगरेट ओढल्यामुळे ओठ काळे पडतात का? सिगरेट बंद करण्याचा उपाय काय?**

दिवसाकाठी चार पांचच पाकिटं सिगरेटी ओढल्या तर ओठ काळे पडत नाहीत. पण यापेक्षा जास्त सिगरेटी झाल्या तर मात्र ओठ काळे पडतात. सिगरेटचा वास येऊ नये म्हणून पान खाण्याची पद्धत आहे. पान खाण्यामुळे ओठही काळ्याऐवजी तांबड्या रंगाचे दिसतात. सिगरेटबरोबर पानाचीही सवय लागते. सिगरेट बंद करण्याचा उपाय म्हणजे विडया किंवा पाईप ओढायला लागणे.

**माझे दात फार पुढे आले आहेत. माझे लग्न होण्यात अडथळा निर्माण झाला आहे. काय करू?**

अगोदरच काळजी घेतली असतीत तर दात पुढे आले नसते. असो, आता काय उपयोग? वास्तविक दात पुढे असण्याचा

अनुक्रमणिका






आणि लग्न होण्याचा काय संबंध आहे हेच आम्हाला कळत नाही. पूर्वीची (दात येण्यापूर्वीच) पाळण्यात असतानाच मुलामुलींची लग्नं लावून देण्याची पद्धत किती चांगली होती हे तुमच्या लक्षात आले असेलच. आता पोरंपोरी स्वतःच निवड करतात. दात पुढे असणे, डोळे बारीक असणे, नाक मोठं असणे, उंदराच्या शेपट्यांप्रमाणे वेण्या असणे, टक्कल असणे, मरघोस मिशा असणे असल्या क्षुल्लक गोष्टीत तरुण मंडळी लक्ष घालू लागली आहेत. शरीरविशेषावरून मुलीनी एखाद्या मुलाला नाकारलं तर समजण्यासारखं आहे. पण आमच्या एका मित्राला, त्याचं नाव केवळ गोपाळ होतं म्हणून नाकारलं. आता बोला. लग्न झाल्यानंतर मुलाचं (वराचं) नाव बदलण्याचीही सोय नाही. तुमचं लग्न होण्यात आम्हालाही अडचण दिसते आहे. कारण मुलींच्या आवडीनिवडी बदलल्या आहेत. आमच्या सहाही मुलींची लग्नं होऊन गेली म्हणून, नाहीतर आम्ही तुम्हाला अडचण भासू दिली नसती. अहो, गरजवंतांना मदत करणं हे आमचं ब्रीदच आहे. तुमचे दात पुढे आहेत म्हणून लग्नात अडथळा, ते पाडून कवळच्या बसवून घेतल्या तरी खोटे दांत म्हणून अडथळा! कवळच्या बसवून घेतल्यानंतर त्यांची मात्र काळजी घ्या. बोळक्या तोंडाच्या तरुणानं स्वप्नातदेखील स्वतःच लग्न झालेलं पाहू नये. एक लक्षात ठेवा. एखाद्या मुलीला, तिचे दात पुढे आहेत या कारणास्तव नाकारू नका.

**माझ्या बायकोच्या दोन बाळंतपणांनंतर मी हळूहळू बारीक होत गेलो आणि आता चांगलाच किरकोळ दिसू लागलो आहे. मात्र किरकोळपणाच्या मानाने अंगात शक्ती आहे.**

अहो असंच असतं. किरकोळ माणसंच शक्तिमान असतात. तुमच्या बायकोला तिसऱ्यांदा दिवस गेले आहेत, खरं की नाही ? कमी उंचीच्या आणि / किंवा किरकोळ देहयष्टीच्या भाणसात; ह्या बाबतीत शक्तीचं प्रमाण जास्तच असतं. तुम्हाला जाड व्हायचंय् असं दिसतं. त्यासाठी व्यायाम करायला हवा. सकाळी म्हणजे पहाटे फिरणे, टेकडीवर फिरायला जाणे, बायकोच्या बाळंतपणात तिच्या अंगाला लावणे (जरा जपूनच), कपडे, दुपटी, बायकोची नऊवारी पातळं किंवा गोधडचा धुणे इ. व्यायामप्रकार आहेत. बायकोच्या बाळंतपणात तिच्यासाठी केलेले डिंकाचे किंवा आळिवाचे लाडू असा खुराकही घ्यावा. व्यायामात किंवा खुराकात कुचराई करू नका, नाहीतर आहात असेच राहाल आणि देशाच्या भवितव्याच्या दृष्टीनं ते धोकादायक आहे.

**पुरुषाच्या तारुण्याचा डौल किती काळपर्यंत कायम राहू शकतो ?**

हल्लीच्या पुरुषांकडे पाहिलं की ते कधी काळी तरुण होते किंवा आत्ता आहेत हे लक्षातच येत नाही. तारुण्यच दिसत नाही तर त्याचा डौल कुठला दिसायला? बेळगावी तूप तारुण्यात चांगलं असं म्हणतात. पण हल्लीचे तरुण बेळगावी तूप खाण्याऐवजी बेळगावी साहित्य वाचतात. आणि याचा दुष्परिणाम असा होतो की म्हातारपणी तारुण्यसुलभ भावना कल्लोळ करुन उठतात आणि ज्याला म्हातारचळ म्हणतात तो सुरू होतो. चांगले किंवा फॅशनेबल् कपडे वापरण्यामुळे आपण तरुण दिसतो, असा एक समज सर्वत्र दिसतो. पण त्यामुळे तारुण्याचा डौल न दिसता नुसता देखावा दिसतो. देखावा तो देखावाच. देखावा केव्हाही ओरबडून टाकता येतो. देखाव्यात जिवंतपणा नसतो. आता खऱ्या अर्थानं तारुण्य आणि त्याचा डौल दिसणं दुरापास्त आहे तेव्हा तो किती काळ कायम राहू शकतो हा प्रश्न अप्रस्तुत आहे.

● ● ●

[पान ४९ वरून–**अशी कशी...**]

लागत नव्हता. बरं, दुसरं कुणी बोलायला तयार नव्हता. प्रकरण पोलिसांपर्यंत येऊन ठेपल्यामुळे सगळ्यांनी तात्यांना हवालदाराच्या तोंडी देऊन आपलं अंग काढून घेतलं होतं. शेवटी पुन्हा वाघमारेच तात्यांच्या मदतीला धावून आले व त्यांनी पोलिसांना इत्थंभूत हकीगत सांगून तात्यांची सुटका केली. तरीपण आपल्याला उगीच हेलपाटा दिल्याबद्दल पोलिसांनी तात्यांना दमदाटी केलीच व पुन्हा असे बोगस रिपोर्ट न देण्याबद्दल ताकीद दिली. वाघमारेंनी हळूच त.त्यांच्या कानाशी लागून पोलिसांना चहासाठी दोन रुपये देण्याची सूचना केली. त.त्यांचा खिसा दोन रुपयांनी हलका झाला पण पोलिसांचे तोंड बंद झाले. पोलिसांना वाटेला लावल्यावर उगीच झोपमोड झाली म्हणून मनातल्या मनात तात्यांना शिव्याशाप देत मंडळीही वाटेला लागली.

थोड्या वेळापूर्वी सगळ्यांच्या पुढे असलेले तात्या आता थिजलेल्या मांजरासारखे सगळ्यांच्या मागून चालले होते. साऱ्यांचा उत्साह पार मावळला होता. एखाद्या भूक मोर्चात सामील झाल्यासारखी मंडळी चालत होती. मोर्चावर एकंदरीत प्रेतयात्रेची कळा पसरली होती. हळूहळू ही मिरवणूक तात्यांच्या घराजवळ आली. रस्त्यात ज्याचं घरं आलं तो कुणाशी न बोलता चालायला लागल्यामुळे मोर्चा बराच रोडावला होता. तात्या जड अंतःकरणाने फाटक उघडून आत गेले. मंडळी तात्यांना सोडून जेमतेम पंचवीस कदम पुढे गेली आणि वातावरणात एक हैराण आरोळी उमटली.

"चो ऽ चो ऽ चो ऽ र, चो ऽ र...."

असं जीवाच्या आकांताने ओरडून तात्या बेशुद्ध पडले होते. मघा चोराच्या पाठलागावर निघताना तात्या गडबडीत उशीखाली किल्ली विसरून गेले होते व तिचाच उपयोग करून चोराने राजरोसपणे समोरचे कुलुप उघडून सगळा कारभार आटोपला होता.

तात्यांची आरोळी ऐकून सगळा मोर्चा रिव्हर्समध्ये आला होता. वानखेडे मास्तर पाणी आणायला धावले होते. धर्माधिकारी तात्यांना हालवून हालवून शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न करीत होते व फाटकांनी अनन्ताला पुन्हा पोलिस आणण्याच्या कामगिरीवर पिटाळले होते. ● ● ●



## युद्ध–घरचे आणि दारचे

गांधी शताब्दीचे वर्ष चालू असताना, त्याबाबत सर्वदूर शासकीय व अशासकीय स्तरावर अनेकविध कार्यक्रम वर्षभर सादर केल्यानंतर, 'अहिंसा परमोधर्मः' अशा पाठचा पार्लमेंट हाऊसपासून ते पानपट्टी-गृहापर्यंत सर्वत्र झळकत असताना, बुद्ध, ख्रिस्त, गांधी यांचा सतत जयजयकार चालू असताना आज तरी हा परमधर्म हा पुस्तकी (वा भित्ती) शोभेचा विषय ठरावा अशीच परिस्थिती ह्या देशात व जगात नांदताना दिसते आहे. "युद्ध की बुद्ध?" असल्या वांझोटया चर्चा ज्यांना युद्ध कल्पनेचेही कापरे भरते अशानाच सुचतात व 'युद्ध' हेच 'युगंधराचे पालुपद' असल्याचा सतत प्रत्यय जग घेत राहते. युद्ध लहान की मोठे हे युद्धमान देशांच्या तयारी-ताकदीवर अवलंबून असते. पण एकीकडे 'शांति हवी' म्हणून करार होत असले तरी दुसरीकडे अण्वस्त्रांचे कारखाने चालूच असतात, विध्वंसक शस्त्रास्त्रांच्या कारखान्यांना टाळी लागत नाहीत. तोफा-बंदुका गरजतच राहतात. आणि "युद्ध नको हो! युद्ध नको" ही लहान, दुबळया राष्ट्रांची विनंती किंकाळी ठरते. ती जिथे फुटते तिथेच विरते. असली राष्ट्रे फक्त "तटस्थांच्या" परिषदा भरवीत बसतात व आपले धोरण (म्हणजे काय?) जगाला कसे पटले आहे ह्याची ग्वाही स्वतःच स्वतःला देत बसतात. अशा लहान मोठया किंकाळया पुष्कळ ऐकू येतात जगात. पण त्यापेक्षाही प्रचंड आवाज होतो तो गरजणाऱ्या तोफांचा, अग्निबाणांचा, रणगाडयांचा! युद्ध हे तसे वाईटच, पण माणसातला सुर आणि असुर कायम आहे (आणि तो राहणार आहे) तोवर 'युद्ध' ही कल्पना डोक्यातून अजिबात काढून टाकून चालत नाही. अण्वस्त्रबंदी करारावर सही करण्याची सक्ती करणाऱ्या रशिया-अमेरिकेने आपले अण्वस्त्र साठे रद्द केल्याचे वा समुद्रात फेकून दिल्याचे वृत्त नाही. उलट त्या अण्वस्त्र स्पर्धेत इंग्लंड, फरान्स यांच्या जोडीला आता चीनसारखे 'युद्धाला'च सनातन व एकमेव धर्म मानणारे राष्ट्रही सामील झाले आहे. अखेर हे सारे प्रयोग-प्रयत्न 'युद्ध नको' म्हणूनच होत आहेत ही यातली गंमत आहे. पण चीन अण्वस्त्रे व अंतराळ संशोधन ह्या दोन्ही बाबतीत जी पावले झपाटयाने टाकीत आहे, त्याबद्दल अण्वस्त्रसज्ज राष्ट्रे-सुद्धा अस्वस्थ होतात. पण "शांतिब्रह्म" भारत मात्र विचलित होत नाही. चीनच्या ह्या वाढत्या सामर्थ्याची जगाला चिंता वाटते कारण 'युद्ध' हा माओ-सिद्धांत आहे. रशिया-अमेरिका हीही अण्वस्त्रसज्ज राष्ट्रे आहेत. पण अण्वस्त्र युद्धाची भीषणता जाणण्याइतपत समज व सुसंस्कृतता त्या राष्ट्रांपाशी आहे; पण चीनचे हे सामर्थ्य वाढले तर साऱ्या जगालाच धोकादायक ठरेल. ह्या प्रश्नावर आमचे धोरण नेहमीप्रमाणेच अकुरणात्मक (निगेटिव्ह) आहे. अण्वस्त्रधारी राष्ट्रे शांतचित्त आहेत. आम्ही भ्रान्त-चित्त आहोत. अण्वस्त्रे असण्याने सामर्थ्य वाढते. धोका टळतो. नसण्याने मात्र–विशेषतः चिनी-पाकिस्तानी शेजार असताना व भारत-वैराबाबत त्यांचे मतैक्य असताना–तो खूप वाढतो. पटींनी वाढतो. पण आम्ही 'गती'च्या गोष्टी कितीही केल्या तरी मुळात आम्ही आहोत स्थिति-प्रियच! आम्हाला शब्द-बदल सुद्धा सहन होत नाहीत. एरव्ही आम्ही तसे क्रांतिकारक! पुरोगामी, बंडखोर वगैरे वगैरे! पण चीनबाबतचे सर्व पूर्वीची धोरणे व अंदाज चुकलेफसले असताना आमचे संरक्षण-मंत्री म्हणतात "दुहेरी आक्रमण (पाक व चीन) झाले तरी त्याचा समाचार घेण्याइतपत आम्ही समर्थ आहोत." नव्या पार्श्वभूमीवर आम्ही विचार केला पाहिजे. कुठलेही धोरण हे अखेर साधन असते, साध्य नव्हे. भारताची एकात्मता, अखंडता, सीमारक्षण, संरक्षण यासाठी सारी धोरणे! पण क्रांतीची परिभाषा बोलणाऱ्या पण मूलतः स्थितिप्रिय असलेल्या भारताने ह्याविषयी 'व्यवहारा'च्या पातळीवर कधी विचारच केलेला नाही. "पूर्व लाल आहे" असं म्हणत चिनी अंतराळयान घिरटया घालू लागल्यावर तरी आम्ही आमची जुनी (व जुनाट) धोरणे पुन्हा तपासून पाहण्याची गरज आहे असे मला वाटते. आमची युद्धनीती म्हणजे युद्ध भीती हीच! आणि धोरण म्हणजे "आम्ही कुणाला फट् सुद्धा म्हणत नाही मग आमच्यावर कोण उगाच बॉम्ब टाकील?" हे! पण चीनचे दात १९६२ साली दिसले असले तरी त्याची पावले आधीच कळलेली होती. चीन सावध होता. आम्ही बेसावधपणे वावरत होतो. त्याची जबर किंमत आम्ही नेफा-लडाख-अक्साई चीन, तिबेटमध्ये दिली व आता 'नक्षलवाद्यां'साठी प. बंगाल, आसाम, नेपाळ, तिबेटलगतचे प्रांत व दक्षिणेतल्या काही प्रांतातून देतो आहोत. हे विकत श्राद्ध आम्ही घेतले आहे. भ्रान्तचित्त असल्यामुळे घेतले आहे. राजकारणात 'अखंड सावधपण' लागते तेच नेमके आम्ही विसरलो. आणि आता तर साऱ्या शक्ती आत्म-खच्चीकरणातच कारणी पडत आहेत. चीन, पाकपेक्षा मोरारजी-कामराज-अप्पा-राम हे देशाचे जणु फार मोठे शत्रु असल्याचा एक आभास उत्पन्न केला जात आहे. साऱ्यांचेच हात ह्यात बरबटले आहेत. त्यामुळे चीनच्या नव्या संकटाचे गांभीर्य कमी होत नाही, वाढते. ह्याबाबत आमची बुद्धिमत्ता, संशोधनशक्ति कमी नाही हे दाखविणारी डॉ. जगन चावला या विख्यात अवकाश संशोधकाची मुलाखत दिल्लीच्या ऑर्गनायझरमध्ये प्रसिद्ध झाली आहे. डॉ

चावला हे संरक्षण संशोधन विभागाचे संचालक म्हणून साडे सहा वर्षे काम केल्यानंतर आणि पंतप्रधान, संरक्षण मंत्री यांच्याशी झालेल्या बोलण्यातून काही निष्पन्न होत नाही असे पाहून त्यानी ती नोकरी सोडली व आता ते खाजगी इंजिनियरिंग सल्लागार म्हणून काम करतात. डॉ. चावला व डॉ. एच. एस्. त्सेन (टी. एस्. आय्. इ. एन. – TSIEN) हे अमेरिकेत मित्र व सहकारी म्हणून काम करीत होते. डॉ. त्सेन यांनीच परवाचे चिनी सॅटेलाइट सोडलेले चावलांनी ऐकले आणि ते उद्विग्न झाले. "आपण आता या मिसाइल टेक्नॉलॉजीत चीनच्या १० वर्षे मागे राहिलो" अशा शब्दात त्यांनी आपली उद्विग्नता व्यक्त केली. पंतप्रधान इंदिराजींना त्यांनी पुन्हा त्याबाबत भेटून विचारण्याचा प्रयत्न केला; पण त्यांच्या पत्राची अजून पोचही आलेली नाही. डॉ. एस्. भगवंतम यांच्या माथी या बाबतच्या (पुच्छ) प्रगतीचे खापर फोडून डॉ. चावला म्हणतात, "पाच वर्षात आपण भारतीय सॅटेलाइट सोडू शकू. एक पैही जास्त लागणार नाही. अॅटमिक एनर्जी कमिशनमध्ये हे काम करता येईल." 'हे आव्हान स्वीकाराल का!' असे विचारता त्यानी 'निश्चित' असे उत्तर दिले. आम्ही सॅटेलाइटची भीक अमेरिका-रशियाकडे मागितली आहे. रशियाने नकार दिला आहे. अमेरिका कदाचित होकार देईलही पण; भारतीय संशोधन शक्तीच्या ह्या उपेक्षेला काळ कसा क्षमा करील? चीनसाठी नव्हे तर आपण समर्थ बनणे आवश्यक असल्याने स्वतःचा विचार करून नवे, वास्तववादी धोरण अंगिकारण्याची गरज आहे असे वाटते. आपल्या समुद्रात चिनी नौका आल्या असल्याची वार्ता नुकतीच वाचली. पूर्व पाकमधून निर्वासितांचे लोंढे गेल्या काही महिन्यात "प्रॉब्लेम" वाटावेत इतके वाढले आहेत. प. बंगाल–आसाम मध्ये गनिमी लढाया (लहान मोठ्या) चालू आहेत. बिहारमधील छैबासा येथे रामनवमीच्या निमित्ताने तुफान जातीय दंगल झाली. आणि महाराष्ट्रात भिवंडी, जळगांव, महाड, वज्रेश्वरी येथे जातीय दंगलींचा डोंब उसळला. ह्या दंगलींची जी माहिती हाती आली आहे व तीत ज्या शस्त्रास्त्रांचा वापर झाला त्याचा तपशील पाहता ह्या दंगली पूर्वनियोजित असल्या पाहिजेत असे म्हणण्याचा मोह होतो. कलकत्त्याचे संमिश्र मं. मंडळ बरखास्त झाले. पण तेथे गांधी प्रतिमा-गांधी साहित्याची विटंबना होते आहे. [illegible]वित्ताबाबत अजूनही निर्धास्त होता आलेले नाही. अजूनही राजकीय हत्या हा प्रकार थांबलेला नाही आणि 'चारित्र्यहनना'चे अ. भा. स्तरावर चाललेले प्रयोग-प्रयत्न पाहिले की वाटते–मानव चंद्रावर पोहचला आहे. ज्याला तांत्रिक बिघाडामुळे पोहचता आले नाही त्याला पृथ्वीवर सुखरूप परत आणण्याइतपत जागतिक संशोधन पुढे जात



अनुक्रमणिका

असता, 'पूर्व लाल'चे इशारे देत चिनी यान भोवती फिरत असताना आम्ही असेच स्वतःभोवती फिरत राहणार आहोत का? अशाच तंगड्यात तंगड्या घालून एकमेकाना पाडून 'क्रांती'च्या टिऱ्या बडवीत राहणार आहोत काय? की काही वस्तुनिष्ठ भूमिका घेणार आहोत?

आणखीही एका गोष्टीबाबत जगात तूर्त रणातणी चालू आहे. आणि त्याही बाबत तूर्त खुद्द अमेरिकेत आणि जगात वादंग माजले आहे. द. व्हिएटनामच्या युद्धातून पाय म.गे घेण्याची भाषा करीत असतानाच अचानकपणे त्या युद्धाचाच एक संलग्न भाग म्हणून अमेरिकेने कंबोडियात द. व्हिएटनामी सेनेबरोबरच आपलेही सैनिक धाडले असून कंबोडियातील अधिकृत सेना व ह्या दोस्तांच्या सेना उत्तर व्हिएटनामी, व्हिएटकाँग सेनेवर तुटून पडल्या आहेत. ह्या घटनेमुळे रशिया-चीन अस्वस्थ झाले आहेत. नरोत्तम सिहनाईक (चुकून सिंहनूक असे म्हटले जाते) यांना माओ-चाओने संरक्षण-आश्रय दिला असून त्यांनी आता आपले परागंदा सरकार स्थापन केले आहे. कांबोडियातील काही ठिकाणांचा 'व्हिएटकाँगी' ठाणी म्हणून वापर करतात, म्हणून मुळातच घाव घालण्याच्या कल्पनेने निक्सन यांनी हे पाऊल टाकले आहे. याबाबतची रशियन प्रतिक्रिया 'विश्वासघात' म्हणून होती. जागतिक युद्धाचे सावट आल्याची परिभाषा काढली गेली. परंतु इजिप्तमध्ये रशियन वैमानिक-तंत्रज्ञ 'प्रत्यक्ष' काम करीत असल्याची वार्ता जर खरी असेल तर हे युद्धजन्य 'शह काटशह' आहेत असे का बरे मानू नये? कंबोडियातही रशियन रणगाडे दिसल्याची वार्ता आहे. दुसऱ्या महायुद्धानंतर जगाची दोन मोठ्या 'पॉवर-ब्लॉक्स'मध्ये विभागणी झाली असून प्रत्येक ब्लॉक आपापली ठाणी बळकट करण्याचा प्रयत्न गेली पंचवीस वर्षे करतो आहे असे म्हटले तर त्यात चूक काय? रशियाने आपली ठाणी बळकट केली आहेत. एक 'झेक' ठाणं ढिलं होतंय् असे दिसताच तेथे रशियन रणगाडे धाडायलाही जे कोसिजिनसाहेब कचरले नाहीत त्यांनी व्हिएटनामी युद्धातल्या क्रियाशील भागाबद्दल अमेरिकेला दोष द्यावा याचे आश्चर्य वाटेल. पण तसे वाटायला नको. कम्युनिस्ट जेव्हा नाक खुपसतात तेव्हा ती 'पीपल्स वॉर' असते. तो 'मुक्तिसंग्राम' असतो. तूर्त इथे देशी अशा मुक्तिसंग्रामाची लाल झलक गाजते आहेच. मग मुक्तिसंग्रामाचा एक अपरिहार्य भाग म्हणून मैत्री संघ येतात, मग सांस्कृतिक शिष्टमंडळांवर पैसा खर्च केला जातो. मग सल्ला मसलत होते. मग 'गुफ्तगू' आणि मग मुक्तिसंग्राम! कंबोडियाचे ठुसठुसते गळू शेजारी ठेवून व्हिएटनाम प्रश्नाची उकल कधी गवसणार नाही. मुळात ही दोन 'इझम्स्'ची लढाई आहे. आणि 'पूर्व लाल' होऊ नये म्हणून 'युद्ध-नीती'चा (वॉर-स्ट्रॅटेजी) भाग म्हणून अमेरिका तेथे गेली काही वर्षे पैसा व माणसे व प्रतिष्ठा गमावीत खडी आहे. दोष द्यायचा झाला तर एकट्या निक्सनना देऊन चालणार नाही. अमेरिकन राष्ट्र व राष्ट्राध्यक्ष (माजी) यांनाही द्यावा लागेल. अमेरिकेत लोकशाही आहे व ती मानण्याचे सौजन्य आयसेनॉवर, रुझवेल्ट, केनेडी, जॉन्सन आणि निक्सन यांच्याजवळ आहे. कंबोडियाचे युद्ध हे दीर्घकाळ खेळले जाणार नाही. विशिष्ट सीमेपर्यंतच अमेरिकन सेना जातील असे निक्सन म्हणतात. व्हिएटकाँगी अड्डे उडवून टाकून व्हिएटनाम युद्धावरचा ताण कमी करणे व मग समर्थपणे 'वाटाघाटी'साठी उभे राहणे हे अमेरिकन उद्दिष्ट दिसते. यापूर्वीच्या वाटाघाटी ह्या 'काँगी' अपरहँड असल्याने काहीच साधू शकल्या नाहीत ही वस्तुस्थिती आहे. चालू मोहिमेत जर अमेरिकेला वरचष्मा सिद्ध करता आला तर व्हिएटनाम प्रश्न सुटायला मदतच होईल. पण रशिया-चीन हे होऊ देणार नाही. शीतयुद्धातले डावपेच ते खेळत राहतील. परोक्ष लढाई लढवीत राहतील. प्रत्यक्ष लढाईकत्तलीमुळे अमेरिका मात्र लोकमानसातून उतरेल. 'चंद्र युद्धा'प्रमाणेच हे 'शीतयुद्ध' चालू आहे. चालू राहणार आहे. साम्राज्यवाद ही सार्वकालिक प्रवृत्ती आहे. तिच्या प्रगतीचा मार्ग विजयातून सुरू होतो. दुसऱ्या महायुद्धाने हे दोन साम्राज्यवादी तट्ट उभे केले आहेत. त्यांचे डावपेच चालू आहेत. आपण फारसं अस्वस्थ होण्याचं तसं कारण नाही. कारण इथेही खणणे चालू आहेच की! आपण त्यावर लक्ष ठेवूया म्हणजे झालं.

**– सारस्वत**

## वसा—

(क. स्वातंत्र्यवीर सावरकरांचे मनोगत
– मला भावलेले)

अलौकिकाचा वसा
आला आहे वाट्याला;
असं मानून –
आणि –
लौकिकाचे यम-नियम –
धाब्यावर बसवून
जगलो जीवन,
दिली फेकून ही नाव
तुफान दरियात
अक्षरशः –
ध्वज फाटले.
देहाच्या झाल्या चिंध्या।
कितीकदा वाटलं
झोक जाऊन
संपणार जीवन।
विजेचे आसूड खात खात
वादळलाटांच्या हत्तीवरून
नाचणारी ही अंबारी
सीमेवर तर पोहचली.
आणि मग —
लौकिकाच्या फूटपट्ट्या
हाती असलेले इंजिनेर
धावले मापायला –
करायला तुला
अलौकिकाची!!
जमाखर्च जमलाच नाही.
करायचा नव्हताच
नौका होती अलौकिकाची
प्रवास होता अनंताचा
मारूनही
न मरणाऱ्या – अनंताचा!!

**– प्रभाकर अत्रे**

अनुक्रमणिका

## चोथा झालेला विषय-झोपडपट्टी

बाबूराव बागूल यांचा हा दुसरा कथा-संग्रह. सामान्य वाचक हादरवून जावा, स्तंभित व्हावा, अशा धाटणीच्या एकूण चौदा कथा या संग्रहात समाविष्ट करण्यात आल्या आहेत. आणि या सर्व कथा झोपड-पट्टी "केंद्रबिंदू" बनवून लिहिल्या गेल्या आहेत. श्री. जयवंत दळवी यांनी प्रथमतः झोपडपट्टी "चक्र" द्वारे बुकडेपोतून आणल्या-नंतर झोपडपट्टीवर फुटलेल्या लाटा अद्यापही ओसरत नाहीत, ही दुर्दैवाची गोष्ट आहे. तात्पर्यः तूर्त झोपडपट्टी चोथा झालेली आहे.

शब्दांच्या माध्यमातून व्यक्त झालेली बागुलांची झोपडपट्टी कशी आहे? वेश्या व्यवसाय, जुगार, दारू, चोरी, हाणामारी बलात्कार, समलिंगी संभोग, महारोगी, सांडपाण्याची डबकी, कुजट वासांचा दर्प, माशा, मच्छर यांचा सतत संचार, पावलो-पावली मृत्यूचे अस्तित्व आणि कायमचं दारिद्र्य अशा उदंड घटना वर्णनांनी बागु-लांची झोपडपट्टी सजली आहे. या झोपड-पट्टीचं जीवन भयंकर आहे, संताप आण-णारं आहे, त्वेष उत्पन्न करणारं आहे, आणि या प्रतिक्रियांना बागुलांची समर्थ लेखणी कारणीभूत आहे.

## ऐसी अक्षरें रसिकें मेळवीन

आई वेश्या झाली म्हणून घर सोडून पळणारा पांडू, मैदानातील माणसांचे हाल पाहून भडकलेला डेव्हिड, मुकेने कासावीस झालेला दानियल, वासनापूर्तीसाठी वेडा-पिसा झालेला पिटर, स्वतःच्या मुलाला "वामण" बनवून देवळाबाहेर भीक मागा-यला बसवणारा, मुलीच्या देहविक्रय पैशां-वर जगणारा आणि धाकट्या मुलाचे हात-पाय पिरगळून त्याला भिकेच्या धंद्यावर बसविण्याचा विचार करणारा वारकू, नाईलाज म्हणून तटस्थपणे झोपडपट्टीत जीवन जगणारा "कवितेचा जन्म"चा कवि नायक, ही सर्व मंडळी अंतःकरणाला चटका लावून जातात. "कवितेचा जन्म" ही कथा मला विशेष आवडली, ती त्यातील गद्य काव्यामुळे!

आता बागुलांच्या भाषाशैलीकडे पाहू, "ती झोपडपट्टी मुंबईने ढकलीत नेऊन समुद्राच्या जवळील एका खाचरात मर म्हणून आदळून दिली होती." (मांडवल) "पाऊस वैरी होऊन डोळे झाकीत कोसळत होता." (मूक) "कैक वर्षे दादागिरी करून अग्नीप्रमाणे अस्पृश्य राहिलेला डेव्हिड मैदानातील माणसांचा मार खात होता." (मैदानातील माणसं) "हा देश म्हणजे एक प्रचंड तुरुंग आहे. त्या तुरुंगातील मी एक कैदी आहे. आणि हे जगणे एक शिक्षाच आहे. पण ही शिक्षा मला का? असा मी काय गुन्हा केला असावा? हे असे काळे किरकोळ, ठेंगणे शरीर माझ्या उज्वल आत्म्याने कां धारण करावे? की त्यालाही जन्मोजन्मी जळण्याची शिक्षाच मिळाली आहे. नाही. माझा आत्मा अपराधी माणसाचा असूच शकत नाही. मी तर शत-कांच्या स्वप्नाचा आविष्कार आहे. उग-वत्या जीवनाचा भाष्यकार आहे."(कवि-तेचा जन्म) असं उत्कृष्ट गद्यकाव्य प्रभावी-पणे साकार करणारे बागूल तितक्याच प्रभावीपणे झोपडपट्टीतले गटारही साकार करतात

मला स्वतःला या संग्रहातील केवळ दोनच कथा ("कवितेचा जन्म", आणि "आई") अत्यंत आवडल्या आहेत. मग उरलेल्या १२ कथांचे काय? अनेक वाङ्-मयीन मतभेद असूनही ते स्थलमर्यादेमुळे व्यक्त करता येत नाहीत. दळवी, कर्णिक, बागूल, किंवा अलिकडले शेणई ("वावर"-चे लेखक) या सर्वांना बकाल घाणेरडी झोपडपट्टीच तेवढी दिसते, आदर्श झोपड-पट्टी कधीच दिसत नाही, झोपडपट्टीमधील माणसांपेक्षा आलिशान फ्लॅटमध्ये रहाणारी माणसं भयंकर आहेत, हे कधीच आणि कां दिसत नाही, याचे आश्चर्य वाटते.

बागुलांच्या संग्रहाला जितके यश मिळाले आहे, तितकेच संग्रहाला अपयशही लाभले आहे. तूर्त बागुलांना मी एवढंच सांगू इच्छितो की, मुंबई शहरात मरण स्वस्त नाही, तर भलतंच कठिण आहे.

**—श्रीकांत सिनकर**

[ मरण स्वस्त होत आहे :— ले. बाबूराव बागुल, ब्रा. ल. पाठक प्रकाशन, पृष्ठे २१६, मूल्य ६ रु.]







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

REGD. NO. MH-450 Licence No. 170 to post without pre-paymet JUNE · 1970

DIPAVALI MONTHLY



Cover Printed At Asha Printery, Bombay-4.



अनुक्रमणिका

# दीपावली

१० वा महाराष्ट्र दिन
मे : १९७०
मूल्य : २ रु.

पांचवा संगीत विशेषांक

अनुक्रमणिका



